# अध्याय १

## प्रथमोऽध्यायः

**धृतराष्ट्र उवाच–**

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय॥१॥**

धृतराष्ट्र म्हणाले–हे संजय! धर्मभूमिस्वरूप कुरुक्षेत्रात माझे पुत्र तथा पांडुपुत्रांनी युद्धाच्या इच्छेने एकत्रित झाल्यावर काय केले?॥१॥

**सञ्जय उवाच–**

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा।**
**आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत्॥२॥**

संजय म्हणाले—महाराज! पांडवांच्या सेनेला व्यूहाकारात अवस्थित पाहून दुर्योधन द्रोणाचार्यांच्या जवळ जाऊन असे बोलू लागला॥२॥

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम्।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता॥३॥**

हे आचार्य! आपले बुद्धिमान शिष्य द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नाद्वारा व्यूहाकारात स्थापित पांडवांच्या या विशाल सेनेचे अवलोकन करा॥३॥

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः॥४॥**

या सेनेत महाधनुर्धारी अर्जुन आणि भीम व त्यांच्या समानच शूरवीर सात्यकी, विराटनरेश आणि महारथी द्रुपद इत्यादी आहेत॥४॥

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान्।**
**पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः॥५॥**
**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान्।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः॥६॥**

या युद्धात धृष्टकेतू, चेकितान, वीर काशिराज, पुरुजित, कुन्तीभोज, नरश्रेष्ठ शैब्य, परम पराक्रमी युधामन्यू, वीर्यवान उत्तमौजा, अभिमन्यू, द्रौपदीचे पुत्र प्रतिबिन्ध्य इत्यादी महारथी आहेत॥५–६॥

**अस्माकन्तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम।**

**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान् ब्रवीमि ते॥७॥**

हे द्विजश्रेष्ठ! आपल्या माहितीसाठी मी आपल्या सेनेच्या त्या सेनानायकांच्या नाम उल्लेख करीत आहे, जे सैन्य संचालनात विशेष करून कुशल आहेत॥७॥

**भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिञ्जयः।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिर्जयद्रथः॥८॥**

आपण स्वतः (द्रोणाचार्य), पितामह भीष्म, कर्ण, समरविजयी (युद्धात विजय मिळविणारे) कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्ताचे पुत्र भूरिश्रवा, सिंधुराज जयद्रथ इत्यादी शूरवीर माझ्या पक्षात आहेत॥८॥

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः॥९॥**

माझ्यासाठी प्राणोत्सर्ग करण्यासाठी (प्राण त्यागण्यासाठी) तत्पर नाना अस्त्र–शस्त्रांनी सुसज्ज आणखीही अनेक वीर आहेत, जे युद्धात निपुण आहेत॥९॥

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम्॥१०॥**

भीष्माच्या द्वारे रक्षित आमचे सैन्यबळ अपर्याप्त (अपरिपूर्ण)आहे, परंतु दुसरीकडे भीमाद्वारे संरक्षित पांडवांचे सैन्यबळ पर्याप्त (परिपूर्ण) आहे॥१०॥

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः।**
**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि॥११॥**

म्हणूनच सर्व प्रवेशद्वारांवर आपापल्या निर्दिष्ट स्थानांवर स्थित होऊन आपण लोक पितामह भीष्मांचेच सर्व प्रकारे रक्षण करा॥११॥

**तस्य सञ्जनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान्॥१२॥**

यानंतर मोठ्या प्रतापी कुरुश्रेष्ठ (कुरुकुलातील ज्येष्ठ) पितामह भीष्मांनी दुर्योधनाच्या हृदयात आनंद उत्पादन करत करत सिंहाप्रमाणे गर्जना करून उच्च स्वरात शंखनाद केला॥१२॥

**ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः।**
**सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत्॥१३॥**

त्यानंतर शंख, नगारे, ढोल, मृदंग, रणशिंग इत्यादी अनेक प्रकारचे वाद्ययंत्र अचानकच एक सोबत वाजू लागले ज्यांचा अतिशय भयंकर ध्वनी झाला॥१३॥

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ।**
**माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः॥१४॥**

यानंतर श्वेत (पांढऱ्या) घोड्यांनी युक्त उत्तम रथावर बसून श्रीकृष्ण तथा

धनंजयाने (अर्जुनाने) दिव्य शंख ध्वनी केला॥१४॥

**पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनञ्जयः।**
**पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः॥१५॥**

हृषिकेश श्रीकृष्णांनी पांचजन्य, अर्जुनाने देवदत्त तथा भयंकर कार्यांना करणाऱ्या भीमाने पौंड्र नाम महाशंख वाजवला॥१५॥

**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ॥१६॥**

कुंतीनंदन महाराज युधिष्ठिराने अनंतविजय, नकुलाने सुघोष तथा सहदेवाने मणिपुष्पक नामक शंख वाजवला॥१६॥

**काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः॥१७॥**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते।**
**सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक्पृथक्॥१८॥**

हे धरणीपते धृतराष्ट्र! महाधनुर्धारी काशीराज, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराटराज, अपराजित सात्यकी, राजा द्रुपद, द्रौपदीचे पुत्र आणि सुभद्रानंदन अभिमन्यू–या सर्वांनी आपापले शंख वाजवले॥१८॥

**स घोषो धार्त्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत्।**
**नभश्च पृथिवीञ्चैव तुमुलोऽभ्यनुनादयन्॥१९॥**

त्या भयंकर शब्दाने आकाश आणि पृथ्वीला प्रतिध्वनित करीत धृतराष्ट्रपुत्रांच्या हृदयांना विदीर्ण केले.

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्त्तराष्ट्रान् कपिध्वजः।**
**प्रवृत्ते शस्त्रसम्पाते धनुरुद्यम्य पाण्डवः।**
**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते॥२०॥**

हे राजन! त्या नंतर आपल्या पुत्रांना युद्धासाठी व्यवस्थित पाहून बाण फेकण्यासाठी तयार कपिध्वज अर्जूनांनी आपले धनुष्य उचलून श्रीकृष्णांना हे वचन म्हटले॥२०॥

**अर्जुन उवाच—**

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत॥२१॥**
**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान्।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे॥२२॥**
**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः।**

**धार्त्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः॥२३॥**

अर्जुन म्हणाले–हे अच्युत! मी जो पर्यंत युद्धाच्या अभिलाषेने उभे असलेल्या या समस्त वीरांना चांगल्या प्रकारे पाहात नाही, या युद्धात कोणत्या लोकांसोबत मला युद्ध करावे लागेल तथा या युद्धात दुर्वुद्धि–परायण धृतराष्ट्र–पुत्रांचे कल्याण इच्छिणाऱ्या एकत्रित योद्धयांचे निरीक्षण करत नाही, तो पर्यंत आपण माझ्या रथाला दोन्ही सेनांच्या मध्ये उभे करावे॥२१–२३॥

**सञ्जय उवाच–**

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम्॥२४॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषाञ्च महीक्षिताम्।**
**उवाच पार्थ पश्यैतान् समवेतान् कुरूनिति॥२५॥**

संजय म्हणाले–हे भारत! गुडाकेश अर्जुनांद्वारे अशा प्रकारे म्हटल्यावर श्रीकृष्णांनी दोन्ही पक्षांच्या सेनेंमध्ये समस्त राजा आणि भीष्म, द्रोण इत्यादी विशिष्ट व्यक्तींसमोर उत्तम रथाला स्थापित केले. श्रीकृष्ण म्हणाले–हे पार्थ! या एकत्रित कौरवांना पाहा॥२४–२५॥

**तत्रापश्यत्स्थितान् पार्थः पितृनथ पितामहान्।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातृन् पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा।**
**श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि॥२६॥**

त्या नंतर अर्जुनाने दोन्ही सेनेंमध्ये उपस्थित आपल्या वडिलांचे भाऊ, आजोबा, आचार्य, मामा, भाऊ, पुत्र, पौत्र (नातू), मित्र, सासरे आणि सुहृद (हितचिंतक) यांना पाहिले॥२६॥

**तान् समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान् बन्धूनवस्थितान्।**
**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत्॥२७॥**

भूमीत उपस्थित आपल्या समस्त बंधू–बांधवांना पाहून अत्यंत करुणायुक्त होऊन कुंतीनंदन अर्जुनांनी असे म्हटले.॥२७॥

**अर्जुन उवाच–**

**दृष्ट्वेमान् स्वजनान् कृष्ण युयुत्सून् समवस्थितान्।**
**सीदन्ति मम गात्राणि मुखञ्च परिशुष्यति॥२८॥**

अर्जुन म्हणाले–हे कृष्ण! युद्धाच्या आकांक्षेने एकत्रित या स्वजनांना

पाहून माझे अंगसमूह शिथिल होत आहेत आणि मुख सुद्धा सुकत आहे॥२८॥

**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते।**
**गाण्डीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते॥२९॥**

माझ्या शरीरात कंप आणि रोमांच उत्पन्न होत आहेत. हातातून गांडीव स्खलित होत आहेआणि त्वचा पण जळते आहे॥२९॥

**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः।**
**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव॥३०॥**

हे केशव! मी आता उभा राहण्यास असमर्थ आहे. माझे मन सुद्धा भ्रमित होत आहे. मी केवळ विपरीत (अशुभ) लक्षण पाहतो आहे॥ ३०॥

**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे।**
**न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च॥३१॥**

हे कृष्ण! युद्धात स्वजनांची हत्या करून काही सुद्धा मंगल होईल असे दिसत नाही. मी युद्धात विजय, राज्य तथा सुखांना इच्छित नाही॥३१॥

**किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा।**
**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च॥३२॥**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च।**
**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः॥३३॥**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः सम्बन्धिनस्तथा।**
**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन॥३४॥**

हे गोविंद! आम्हाला राज्य, भोग आणि जीवनाशी काय प्रयोजन आहे? ज्यांच्यासाठी राज्य आणि सुख-भोग इच्छित आहे, ते सर्व अर्थात आचार्य, पितृव्य, पुत्र, पितामह, मामा, सासरे, नातू, पत्नीचे भाऊ आणि संवंधिगण प्राण आणि धन देण्यासाठी तत्पर होऊन माझ्या समक्ष उभे आहेत. म्हणून हे मधुसूदन! जर हे लोक माझा वध जरी करतील, तरीही मी यांची हत्या करू इच्छित नाही॥३२-३४॥

**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किन्नु महीकृते।**
**निहत्य धार्तराष्ट्रान् नः का प्रीतिः स्याज्जनार्दन॥३५॥**

हे जनार्दन! या पृथ्वीसाठी तर काय सांगू, तिन्ही लोकांच्या राजत्वासाठीसुद्धा धृतराष्ट्राच्या पुत्रांचा वध करून आम्हाला काय सुख प्राप्त होईल?॥३५॥

**पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः।**
**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् सबान्धवान्।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव॥३६॥**

हे माधव! या सर्व आततायींना मारल्याने आम्हालाच पाप लागेल, म्हणून बांधवांसहित दुर्योधनाचा वध करणे आमच्यासाठी उचित नाही आहे. कारण, स्वजनाची हत्या करून आम्ही कसे सुखी होऊ?॥ ३६॥

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम्॥३७॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम्।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन॥३८॥**

हे जनार्दन! राज्याच्या लोभाने भ्रष्टबुद्धी होऊन दुर्योधन इत्यादी वंशनाशापासून उत्पन्न दोष आणि मित्रद्रोहापासून उत्पन्न पापास पाहात नाही आहेत. परंतु याला जाणणाऱ्या आम्हा लोकांना या दोषांपासून निवृत्त होण्यासाठी विचार करायला नको का?॥३७-३८॥

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत॥३९॥**

वंशनाशाने वंशपरंपरा द्वारा प्राप्त धर्मसमूह नष्ट होऊन जातात. धर्म नष्ट झाल्यावर संपूर्ण कुलाला अधर्म दाबून (गाडून) टाकतो॥३९॥

**अधर्माभिभवात् कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसङ्करः॥४०॥**

हे कृष्ण! अधर्माद्वारे कुळ अभिभूत झाल्यावर कुलाच्या स्त्रिया भ्रष्ट होऊन जातात. हे वृष्णिवंशी! स्त्रिया भ्रष्ट झाल्यावर वर्णसंकराची उत्पत्ती होते॥४०॥

**सङ्करो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च।**

**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः॥४१॥**

वर्णसंकर कुळघातींना तथा कुळाला नरकात घेऊन जातो. त्यांचे पितृगणसुद्धा जलहीन आणि पिंडहीन होऊन निश्चितच पतित होतात॥४१॥

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसङ्करकारकैः।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः॥४२॥**

कुळघातींचे या सर्व दोषांद्वारे सनातन जातिधर्म आणि कुळधर्म विलुप्त होऊन जातात॥४२॥

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम॥४३॥**

हे जनार्दन! मी असे ऐकले आहे की कुलधर्मविहीन लोकांना अनंत काळ पर्यंत नरक भोग करावा लागतो॥४३॥

**अहो बत महत्पापं कर्त्तुं व्यवसिता वयम्।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः॥४४॥**

हाय! किती खेदाची गोष्ट आहे की आम्ही लोक राज्यसुखाच्या लोभाने स्वजनांची हत्या करण्यासाठी उद्यत आहोत आणि हे महापाप करण्यासाठी कृतसंकल्प आहोत॥४४॥

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः।**
**धार्त्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत्॥४५॥**

जरी अस्त्रविहीन तथा आत्मरक्षेकरिता प्रयत्नरहित मला शस्त्रधारी धृतराष्ट्राचे पुत्रगण युद्धात मारून जरी टाकतील, तरीसुद्धा हे माझ्याकरिता हितकर होईल॥४५॥

**सञ्जय उवाच—**

**एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः॥४६॥**

संजय म्हणाले—शोकाने उद्विग्न मन असणाऱ्या अर्जुनांनी युद्धभूमीत असे म्हणून बाणासहित धनुष्याचा परित्याग केला आणि ते रथावर बसले॥४६॥

*इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ‘सैन्यदर्शनं’ नाम प्रथमोऽध्यायः।*

# अध्याय २

## द्वितीयोऽध्यायः

**सञ्जय उवाच—**

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्।**
**विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः॥१॥**

संजय म्हणाले—अशा प्रकारे करुणेने अभिभूत, अश्रुपूर्ण तथा व्याकूळ डोळे असणाऱ्या, विषादयुक्त अर्जुनास श्रीभगवान मधुसूदन हे वचन म्हणाले॥१॥

**श्रीभगवानुवाच।**

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन॥२॥**

श्रीभगवान म्हणाले—हे अर्जुन! कोणत्या कारणास्तव तुझ्यात या भीषण विपदकाळात अनार्यांच्या द्वारा आचरित, स्वर्ग आणि कीर्तीला न देणारा हा मोह उपस्थित झाला आहे?॥२॥

**क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परन्तप॥३॥**

हे पार्थ! तुम्ही अशा प्रकारे नपुंसकतेला प्राप्त होऊ नका. तुम्हाला हे शोभा देत नाही. हे परंतप! तुम्ही या क्षुद्र हृदयाच्या दुर्बलतेचा परित्याग करीत युध्दासाठी उभे राहा॥३॥

**अर्जुन उवाच–**

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणञ्च मधुसूदन।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन॥४॥**

अर्जुन म्हणाले – हे शत्रुदमनकारी मधुसूदन! मी कशा प्रकारे या युद्धात पूजनीय भीष्म पितामह आणि द्रोणाचार्यांच्या विरुद्ध बाणांद्वारे युद्ध करू?

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्॥५॥**

महानुभाव गुरुजनांना न मारून या संसारात भिक्षान्नाद्वारे सुद्धा उदर–निर्वाह करणेच कल्याणकारी आहे. परंतु गुरुजनांची हत्या केल्याने या लोकातच रक्तरंजित अर्थ आणि कामरूप भोगांना भोगावे लागेल॥५॥

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्त्तराष्ट्राः॥६॥**

आमच्यासाठी युद्धात जिंकणे वा पराजित होण्यात काय श्रेष्ठ आहे–मी हे समजू शकत नाही. कारण, ज्यांची हत्या करून आम्ही जिवितसुद्धा राहू इच्छित नाही, ते धृतराष्ट्राच्या पक्षाचे लोक युद्धासाठी समोर उभे आहेत॥६॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥७॥

स्वाभाविक शौर्यधर्माचा परित्याग करून भित्रेपणारूप धर्माने अभिभूत, धर्माच्या निरूपणात मोहित चित्त असलेला मी आपल्याला विचारतो– माझ्यासाठी जे मंगलकारी आहे, ते निश्चित करून आपण सांगा. मी आपला शिष्य आहे. म्हणून मला शरणागताला आपण शिकवण प्रदान करा॥७॥

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम्**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम्॥८॥**

पृथ्वीचे निष्कंटक आणि समृद्ध राज्य आणि देवतांच्या आधिपत्याला प्राप्त करून मी कोणताही उपाय पाहात नाही, जो इंद्रियांना सुकवणाऱ्या या शोकाला दूर करू शकेल॥८॥

**सञ्जय उवाच–**

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परन्तपः।**
**न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह॥९॥**

संजय म्हणाले–अशा प्रकारे बोलल्यानंतर शत्रूंचे दमन करणारे अर्जुन श्रीकृष्णाला असे म्हणून चूप झाले की हे गोविंद! मी युद्ध करणार नाही॥९॥

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः॥१०॥**

हे भरतवंशी धृतराष्ट्र! त्यावेळी दोन्ही सेनांच्या मध्यभागी शोकातुर अर्जुनाशी श्रीकृष्ण जणू हसत असे बोलले.॥१०॥

**श्रीभगवानुवाच–**

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः॥११॥**

श्रीभगवान म्हणाले–तुम्ही शोक न करण्यायोग्य वस्तूंसाठी (व्यक्तींसाठी) शोक करता आहात, पुन्हा पांडित्यपूर्ण शब्दपण बोलत आहात. परंतु, पंडितगण तर प्राणहीन (मृत) किंवा प्राणवानां(जिवितां)साठी शोक करीत नाहीत॥११॥

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम्॥१२॥**

असे कधी काळी झाले नाही की मी (कृष्ण) नव्हतो, तू (अर्जुन) नव्हता आणि हे सर्व राजा लोक नव्हते आणि न भविष्यात असे कधी होणार नाही की आम्ही लोक नसू॥१२॥

**देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति॥१३॥**

ज्याप्रकारे शरीरधारी जीवात्मा या स्थूल शरीरात क्रमशः कुमारावस्था, यौवनावस्था आणि वृद्धावस्था प्राप्त होतो, त्याचप्रकारे मृत्यूनंतर जीवात्म्याला अन्य शरीर प्राप्त होते. धीर व्यक्ती या विषयी अर्थात शरीराचा नाश आणि उत्पत्तीच्या विषयी मोहित होत नाही॥१३॥

**भावानुवाद**––जर प्रश्न असेल की आत्म्याच्या संबंधाने देह देखील प्रीतीचा पात्र होईल, देहाच्या संबंधाने पुत्र, भाऊ इत्यादी आणि त्यांच्या संबंधाने पौत्र (प्रपुत्र, पुत्राचा पुत्र, नातू) आदी देखील प्रीतीचे पात्र होतील, म्हणून त्या लोकांचा मृत्यू झाल्यावर शोक होईलच, तर याच्या उत्तरात म्हणतात––'देहिनः' इत्यादी. ज्या प्रकारे जिवाला या देहात कौमार (कुमारता, कुमार असण्याची अवस्था किंवा भाव, पाच वर्षांच्या वयापर्यंतचे बालपण) अवस्था प्राप्त होते, कौमाराचा (कुमार–अवस्थेचा) क्षय झाल्यावर यौवन प्राप्त होते तथा यौवनाचा क्षय झाल्यावर वृद्धावस्था (म्हातारपण) प्राप्त होते, त्याच प्रकारे देहाचा क्षय झाल्यावर अन्य देह प्राप्त होतो. म्हणून ज्या प्रकारे आत्म्याशी संबंध–विशिष्ट प्रीत्यास्पद कौमारादीचा क्षय झाल्यावर शोक केला जात नाही, त्याच प्रकारे आत्म्याच्या संबंधाने जो देह प्रीतीचा पात्र बनला आहे, त्याच्यासाठी देखील शोक करणे उचित नाही आहे.

जर यौवनाचा क्षय झाल्यावर वृद्धावस्था (म्हातारपण) प्राप्त झाल्याने शोक होतो, तर कौमार अवस्थेचा क्षय झाल्यावर जेव्हा यौवन प्राप्त होते, त्याने हर्ष देखील तर उत्पन्न होतो. म्हणून भीष्म–द्रोणादींच्या जीर्ण शरीराचा नाश झाल्यावर नव्या देहाला प्राप्त करण्याच्या उपलक्ष्यात (तुम्हाला) हर्ष किंवा आनंद व्हायला पाहिजे अथवा तुम्हाला असे समजायला हवे की ज्या प्रकारे एकाच देहात कौमारादी प्राप्त होते, त्याच प्रकारे एकाच देहीला (जीवाला) अनेक प्रकारचे देह प्राप्त होतात॥१३॥

**सा. व. प्रकाशिका वृत्ती**––देहीचे तात्पर्य आत्मा अथवा जिवाशी आहे. हा अपरिवर्तनशील आहे, परंतु देह परिवर्तनशील आहे. शरीरात कौमार, यौवन, जरा (म्हातारपण, वार्धक्य, वृद्धावस्था, म्हातारपणा, उतारवय, वृद्धत्व, वृद्धपण) आणि मृत्युरूप परिवर्तन झाल्यावर देखील देही–आत्म्यात कोणतेही परिवर्तन होत नाही. हा सदा (नेहेमी) एकरस राहातो. म्हणून शरीराचा विनाश झाल्यावर शोक करणे उचित नाही आहे. जशी कुमारावस्था विगत झाल्यावर युवावस्थेच्या आगमनाने शोकाच्या बदल्यात (ऐवजी) आनंदच होतो, तसेच मृत्यूच्या पश्चात नवे, सक्षम आणि सर्वांगसुंदर शरीराची प्राप्ती झाल्यावर दुःखाची काय गोष्ट आहे, तेथे तर आनंदच व्हायला हवा. महाराज ययाती आपले श्वसुर (सासरे) शुक्राचार्यांच्या अभिशापाने युवाकाळातच वृद्ध झाले होते. त्यांनी फारच दुःखी होऊन शुक्राचार्यांच्या चरणी कातर होऊन क्षमा मागितली. शुक्राचार्यांनी आपल्या कन्येला (लेकीला) खूश करण्यासाठी ययातींना वरदान दिले की आपल्या युवा पुत्रांपैकी कोण्या एकाशी आपल्या वृद्धावस्थेचे आदान–प्रदान करू शकतील. ज्येष्ठ (थोरला) पुत्र यदूने आपली युवावस्था देऊन पित्याची (वडीलांची) वृद्धावस्था घेणे अस्वीकार केले, कारण ते भगवद्–भजन (भगवंतांचे भजन) करू इच्छित होते, परंतु त्यांच्या पुत्र पुरूंनी आपली युवावस्था देऊन आपल्या पित्याची वृद्धावस्था ग्रहण केली. अशा प्रकारे ययाती पुन्हा युवा होऊन देवयानी इत्यादी राण्या आणि पुत्र–पौत्रांसोबत (मुले आणि नातवांसोबत) भोग करीत स्वतःला फारच सुखी समजू लागले. परंतु, शेवटी या सुखांना आपात्–रमणीय आणि

परिणामतः (परिणामी) अशेष दुःखकर समजून आपल्या पुत्राला त्याची युवावस्था परतवून वनात भगवत्-भजन करण्यासाठी निघून गेले. (श्रीमद्भा. ९/१८)

म्हणून जराग्रस्त (म्हाताऱ्या), जीर्ण-शीर्ण शरीराचा नाश झाल्यावर सबळ, स्वस्थ, सुंदर नव्या शरीराच्या प्राप्तीने लाभच होईल--हे जाणून आनंदित होणेच उचित आहे॥१३॥

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत॥१४॥**

हे कुंतीनंदन! इंद्रियांच्या वृत्तीसोबत विषयांच्या संयोगाने थंडी, गरमी, सुख आणि दुःख प्राप्त होतात. ते क्षणभंगुर आणि अनित्य असतात. म्हणून हे भारत! तुम्ही त्याला सहन करा॥१४॥

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते॥१५॥**

हे पुरुषोत्तम! जो धीर व्यक्ती मात्रा-स्पर्श, सुख, दुःख इत्यादींना समान समजतो आणि यांनी विचलित होत नाही, तो निश्चितच मुक्ती प्राप्त करण्यायोग्य आहे॥१५॥

**भावानुवाद**--अशा प्रकारे विचारपूर्वक त्या विषयांना सहन करण्याचा अभ्यास केल्याने त्यांच्या अनुभव काळात दुःख होणार नाही. जर हे विषय दुःख देत नाहीत, तेव्हा तर आत्ममुक्ती स्वतःच समीप (जवळ) येईल. म्हणून येथे 'यं' इत्यादी सांगितले जाते आहे. येथे 'अमृतत्वाय'च अर्थ आहे--मोक्ष।।१५।।

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्व-दर्शिभिः॥१६॥**

असत् वस्तू (शीत-उष्ण इत्यादी)ची तर सत्ता नाही आहे आणि नित्य वस्तू (आत्मा) चा विनाश होत नाही. तत्त्वदर्शी लोकांनी सत् आणि असत् वस्तूचे परीक्षण करून असा निष्कर्ष काढला आहे॥ १६॥

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति॥१७॥**

परंतु, जो या सर्व शरीरात व्याप्त आहे, त्यालाच तुम्ही अविनाशी

जाणा. कोणीच त्या अविनाशी(आत्म्या)चा विनाश करण्यास समर्थ नाही आहे॥१७॥

**सा. व. प्रकाशिका वृत्ती—**अविनाशी तत्त्वे दोन आहेत—एक अणू चैतन्य जीवात्मा आणि दूसरे समस्त जीवात्मांचे प्रकाशक आणि नियंता परमात्मा. जड-चेतन (निर्जीव आणि सजीव) समस्त पदार्थांमध्ये एकच परमात्मा साक्षीरूपात विराजमान असतो. जीवात्मा अनंत आहेत. एक-एक (प्रत्येक) स्थूल शरीरात पृथक-पृथक (वेगवेगळया) रूपात एक-एक आत्मा स्थित आहे. प्रत्येक शरीराचा आत्मा पृथक-पृथक (वेगवेगळया) रूपात सुख-दुःखादीचा अनुभव करतो. परब्रह्म परमात्मा या सर्वांच्या सुख-दुःखाच्या वरती केवळ साक्षीरूपात वर्तमान राहातात. या श्लोकात जीवात्मारूप अविनाशीची गोष्ट सांगितली गेली आहे. हा अणुचित् जीवात्मा शरीराच्या एका भागात स्थित असूनही साऱ्या शरीरात कसा अनुभूत होतो—या प्रश्नाचे उत्तर भगवान श्रीकृष्ण या श्लोकात देत आहेत. वेदान्त-सूत्राने देखील श्रीकृष्णांच्या उपरोक्त कथनाची पुष्टी होते—'*अविरोधश्चन्दनवत्*' (ब्रह्म-सूत्र २/३/२२) अर्थात जसा हरि-चंदनाचा एक थेंब शरीराच्या एका स्थानावर (भागावर) लावल्याने साऱ्या शरीरात याच्या शीतलतेचा अनुभव होतो, तसेच जीव देखील शरीराच्या एक भागात स्थित होऊन देखील साऱ्या शरीरात अनुभूत होतो. स्मृतीत देखील या कथनाची पुष्टी झाली आहे—

*'अणुमात्रोऽप्ययं जीवः स्वदेहेव्याप्य तिष्ठति।*
*यथा व्याप्य शरीराणि हरिचन्दनविप्रुषः॥'*

अर्थात, ज्या प्रकार हरिचन्दन-बिन्दू शरीराच्या एका भागात अवस्थित राहून देखील साऱ्या शरीराला आनंददायक असतो, जीव देखील त्याच प्रकारे एक स्थानी अवस्थित राहून देखील सर्वदेह व्यापक असतो.

जर हा प्रश्न असेल की जीवात्मा देहाच्या कोण्याही भागात अवस्थित असतो, तर याच्या उत्तरात म्हणतात—जीव हृदयात अवस्थित असतो—'हृदि ह्येष आत्मेति' (षट्प्रश्नी श्रुती). वेदान्त-सूत्रात देखील असे देखील म्हटले आहे—'*गुणाद्वालोकवत्*' (ब्रह्म-सूत्र २/३/३२४) अर्थात जीव आपल्या गुणाच्या प्रकाशाप्रमाणे साऱ्या

शरीरात व्याप्त राहातो, जीव अणू असूनही चेतनेच्या गुणाने युक्त असल्यामुळे समस्त शरीरात व्याप्त राहातो. ज्या प्रकारे सूर्य आकाशाच्या एका भागात स्थित होऊन देखील आपल्या प्रकाशात सम्पूर्ण खगोलात (अंतरिक्षात) व्याप्त राहातो, अशा प्रकारे जीव देखील साऱ्या शरीरात व्याप्त राहातो. भगवंतांनी स्वतः गीते (१३/३३) मध्ये असे देखील म्हटले आहे. ॥१७॥

**अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत॥१८॥**

नित्य एकरूप, विनाशरहित आणि अपरिमेय (मोजण्यास अयोग्य)) जीवात्म्याचे हे सर्व भौतिक शरीर नाशवंत आहे. म्हणून हे अर्जुन! तू युद्ध कर॥१८॥

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम्।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते॥१९॥**

जी व्यक्ती या जीवात्म्यास वध करणारी समजते आणि जी व्यक्ती या जीवात्म्यास वध होणारी समजते–त्या दोन्ही व्यक्ती अज्ञ (अजाण) आहेत, कारण जीवात्मा न तर कोणाची हत्या करतो आणि नाही कोणाद्वारे हत होतो (मारला जातो)॥१९॥

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥२०॥**

हा जीवात्मा कधीही जन्म घेत नाही आणि कधी मरत नाही अथवा पुन्हा पुन्हा याची उत्पत्ती वा वृद्धी होत नाही. हा अजन्मा, नित्य, शाश्वत आणि प्राचीन असूनही नित्य नवीन आहे. शरीर नष्ट झाल्यावरही जीवात्म्याचा विनाश होत नाही॥२०॥

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम्।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम्॥२१॥**

हे पार्थ! जी व्यक्ती आत्म्याला नित्य, अजन्मा, अव्यय आणि अविनाशी जाणते, ती कशा प्रकारे कोणाची हत्या करवेल वा करेल?॥२१॥

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥२२॥**

ज्याप्रकारे मनुष्य जुन्या वस्त्रांना त्यागून दुसऱ्या नव्या वस्त्रांना ग्रहण करतो, त्याचप्रकारे जीवात्मासुद्धा जुन्या शरीरांना त्यागून दुसऱ्या नव्या शरीरांना धारण करतो॥२२॥

**भावानुवाद**—जर तुम्ही म्हणाल की माझ्या युद्धामुळे जीवात्मा भीष्म नामक शरीराचा परित्याग करेल आणि त्याच्या जागी आपण आणि मी याचे कारण होऊ, तर ऐका—नवीन वस्त्र (कपडा) घालण्यासाठी जुन्या वस्त्राचा (कपड्याचा) परित्याग करण्यात काय कोणता दोष आहे? भीष्म आपल्या जीर्ण शरीराचा परित्याग करून नूतन शरीर धारण करतील, याच्यात तुमचा किंवा माझा काय दोष आहे?॥२२॥

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः॥२३॥**

या जीवात्म्याला शस्त्रांनी कापले जाऊ शकत नाही, न आगीद्वारे जाळले जाऊ शकते, आणि न पाण्याद्वारे भिजवले जाऊ शकते, आणि न वायूद्वारे सुकविले जाऊ शकते॥२३॥

**भावानुवाद**--हे अर्जुन! तुमच्या द्वारे युद्धात प्रयुक्त शस्त्रादींद्वारे आत्म्याला कोणत्याही प्रकारची व्यथा किंवा पीडेची संभावना नाही आहे. याच्यासाठी श्रीभगवान 'नैनं' इत्यादी म्हणत आहेत. येथे 'शस्त्राणि' चा अर्थ आहे--खड्गादी (तलवार वगैरे), 'पावकः'चा अर्थ आहे--आग्नेयास्त्र, 'आपः'चा अर्थ आहे--पार्जन्यास्त्र आणि 'मारुतः'चा अर्थ आहे--वायव्यास्त्र. हे अर्जुन! तुमच्या द्वारे प्रयुक्त या साऱ्या अस्त्रांद्वारे देखील आत्म्याला कोणतीही पीडा होणार नाही॥२३॥

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः॥२४॥**
**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयम् उच्यते।**
**तस्माद् एवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि॥२५॥**

हा जीवात्मा अविभाज्य, अदाह्य (न जळणारा), अक्लेद्य (ओला न होणारा) आणि अशोष्य (सुकण्यायोग्य नसणारा) आहे. हा नित्य, सर्वव्यापक, स्थायी, अचल, आणि सनातन आहे. हा अव्यक्त, अचिंत्य आणि अविकारीपण म्हणविला जातो. जन्म इत्यादी षड् विकाररहित असल्याने हा अविकारीपण म्हणविला जातो. म्हणून

जीवात्म्यास अशा प्रकारे जाणल्यानंतर तुमचे शोक करणे उचित नाही॥२४–२५॥

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम्।**
**तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि॥२६॥**

हे महाबाहो! आणखी, जर तुम्ही जीवात्म्याला नित्य जन्म घेणारा आणि नित्य मरणारा मानत असाल, तरी पण तुम्हाला अशा प्रकारचा शोक करण्याचे कोणतेही कारण नाही॥२६॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि॥२७॥**

कारण, ज्याने जन्म ग्रहण केला आहे त्याचा मृत्यू निश्चित आहे आणि मृत व्यक्तीचा जन्म पण निश्चित आहे. म्हणून या अपरिहार्य (अवश्यंभावी, अनिवार्य) विषयात शोक करणे उचित नाही॥२७॥

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना॥२८॥**

हे भारत! सर्व जीव जन्माच्या पूर्वी अव्यक्त राहतात, जन्मानंतर मध्यावस्थेत व्यक्त होतात आणि मृत्यूनंतर पुन्हा अव्यक्त होतात. म्हणून या विषयात शोकाचे काय कारण आहे?॥२८॥

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद् वदति तथैव चान्यः।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्॥२९॥**

कोणी जीवात्म्यास आश्चर्याप्रमाणे पाहतात, कोणी यास आश्चर्याप्रमाणे बोलतात, कोणी यास आश्चर्याप्रमाणे ऐकतात, परंतु कोणी कोणी ऐकून सुद्धा याला जाणू शकत नाहीत॥२९॥

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि॥३०॥**

हे अर्जुन! शरीरधारी हा आत्मा सर्व शरीरांमध्ये नित्य अवध्यरूपात अवस्थित आहे, म्हणून जीवात्म्यासाठी तुम्हाला शोक करणे उचित नाही॥३०॥

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते॥३१॥**

दुसरीकडे स्वधर्माचा विचार करूनसुद्धा तुम्हाला विचलित होणे उचित

नाही, कारण धर्मासाठी युद्ध करण्यापेक्षा क्षत्रियासाठी अन्य काहीच मंगलप्रद नाही॥३१॥

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम्।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम्॥३२॥**

हे पार्थ! भाग्यवान क्षत्रियगणच स्वर्गाच्या खुल्या द्वारासमान अशा युद्धाच्या संधीला अनायास प्राप्त करतात.

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि।**
**ततः स्वधर्मं कीर्त्तिञ्च हित्वा पापमवाप्स्यसि॥३३॥**

या उलट जर तुम्ही हे धर्मयुद्ध केले नाही, तर स्वधर्म आणि कीर्ती हरवून पाप अर्जित कराल (कमवाल).

**अकीर्तिञ्चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम्।**
**सम्भावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते॥३४॥**

सर्व लोक सदैव तुमच्या अक्षय अकीर्तीची चर्चा करतील. सन्मानित व्यक्तीसाठी अपयश तर मरणापेक्षा ही अधिक कष्टदायक आहे॥३४॥

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम्॥३५॥**

दुर्योधन इत्यादी महारथी तुला भययुक्त होऊन युद्धातून पलायन करणारा समजतील. म्हणून ज्यांच्यापाशी इतके दिवसांपर्यंत बहुसन्मानित झालास, तेच तुला तुच्छ समजतील॥३५॥

**अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः।**
**निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम्॥३६॥**

तुमचे शत्रुलोक तुमच्या सामर्थ्याची निंदा करीत अनेक न सांगण्याजोग्या गोष्टी सांगतील. हे अर्जुन! यापेक्षा अधिक दुःखाचा विषय आणखी काय असू शकतो?॥३६॥

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्।**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः॥३७॥**

हे कुंतीनंदन! युद्धात मारल्या गेल्यावर तुला स्वर्ग प्राप्त होईल अथवा जिंकल्यावर पृथ्वीचा भोग करशील. म्हणून कृतसंकल्प होऊन युद्धासाठी उभा हो॥३७॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ।**

**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि॥३८॥**

सुख-दुःख, लाभ-हानी आणि जय-पराजय यांना समान जाणत तुम्ही युद्धाला तत्पर व्हा. अशा प्रकारे तुम्हाला पाप लागणार नाही॥३८॥

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु।**
**बुध्द्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि॥३९॥**

हे पार्थ! आतापर्यंत मी तुम्हाला सांख्ययोगाच्या गोष्टी सांगितल्या, परंतु आता तुम्हाला भक्तियोगाच्या संबंधित ज्ञान देत आहे, ज्या बुद्धीस (ज्ञानास) प्राप्त केल्यावर तुम्ही संसारातून मुक्त होऊन जाल॥३९॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्॥४०॥**

या भक्तियोगात केला गेलेला प्रयत्न विफल होत नाही आणि याच्यात कोणता दोषही नसतो. या अनुष्ठानाचे (धर्माचे) थोडेसेही पालन संसाररूप महान भयातून मुक्त करून टाकते॥४०॥

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन।**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्॥४१॥**

हे कुरुनंदन! या भक्तिमार्गात जी निश्चयात्मिका बुद्धी आहे, ती एकनिष्ठा आहे, परंतु भक्ति-बहिर्मुख व्यक्तींच्या बुद्ध्या अनंत आणि अनेक शाखांच्या असतात॥४१॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः॥४२॥**

जे मूर्ख लोक वेदाच्या अर्थवादात रत आहेत, ते वेदांत वर्णित आपात मनोरम परंतु परिणामात विषमय अलंकारी (अलंकारिक) वाक्यांनाच वेदवाक्य म्हणतात. ते स्वर्ग इत्यादी फळांच्या अतिरिक्त अन्य ईश्वर-तत्त्वास मानत नाहीत॥४२॥

**कामात्मानः स्वर्गपराः जन्मकर्मफलप्रदाम्।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति॥४३॥**

म्हणून कामाच्या द्वारे कलुषित चित्त असणारे ते स्वर्गप्रार्थी (स्वर्गाची इच्छा करणारे) सकाम पुरुष भोग आणि ऐश्वर्याच्या प्राप्तीच्या साधनस्वरूप जन्म आणि कर्मात बांधणाऱ्या विविध क्रियानांच प्रकृष्ट वेदवाक्य म्हणतात॥४३॥

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते॥४४॥**

त्या मधुपुष्पित वाक्यांनी ज्यांचे चित्त हरण केले आहे, भोग आणि ऐश्वर्यात आसक्त अशा व्यक्तींच्या समाधीत अर्थात भगवंतात निश्चयात्मिका बुद्धी नसते॥४४॥

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।**
**निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥४५॥**

हे अर्जुन! तुम्ही वेदांत वर्णित तीन गुणांचा परित्याग करून निर्गुण (त्रिगुणातीत) तत्त्वात प्रतिष्ठित व्हावे. तुम्ही समस्त द्वंद्वात (मान–अपमान इत्यादी) पासून रहित होऊन योगक्षेमाची चिंता न करीत माझ्याद्वारे प्रदत्त बुद्धियोगाद्वारे शुद्धसत्त्वात प्रतिष्ठित होऊन जावे॥४५॥

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके।**
**तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः॥४६॥**

**अन्वय–**यावान्(जितका) अर्थः (प्रयोजन) उदपाने (विहीरीने) [भवति–सिद्ध होते] तावान् (तितके प्रयोजन) सर्वतः (सर्वतोभावेन) संप्लुतोदके (महाजलाशयाने सिद्ध होते) [तथा–त्याच प्रकारे] सर्वेषु वेदेषु (समस्त वेदांमध्ये) [यावन्तोऽर्थास्तावन्तः–जितके प्रयोजन आहेत, ते सर्व विजानतः ब्राह्मणस्य (वेदज्ञ भक्तियुक्त ब्राह्मणाला) [भवति–होतात]॥४६॥

**अनुवाद–ज्याप्रकारे एका छोट्या जलाशयाद्वारे जितके प्रयोजन सिद्ध होते, तितकेच प्रयोजन एका मोठ्या जलाशयाद्वारे अनायासेच सिद्ध होते, त्याचप्रकारे वेदांमध्ये वर्णित विभिन्न देवतांच्या पूजेने जे फळ प्राप्त होते, ते सर्व फळ वेदांचे तात्पर्य जाणणाऱ्या भक्तियुक्त ब्राह्मणांच्या भगवत्–उपासनेद्वारे अनायासेच प्राप्त होते॥४६॥**

**भावानुवाद–**अहो! ज्या निष्काम, निर्गुण भक्तियोगाच्या आरंभ–मात्राचा कोणताही नाश नाही आणि कोणताही प्रत्यवाय सुद्धा नाही, त्याच्या माहात्म्याच्या संबंधात आणि काय लिहू? श्रीमद्–भागवत (११/२९/२०) मध्ये उद्धवांना देखील भगवंतांनी म्हटले आहे–"हे उद्धव! माझ्या द्वारे या धर्माचे निर्गुणत्व यथार्थरूपात निर्णीत झाले आहे, म्हणून माझ्यासाठी केल्या गेलेल्या निष्काम धर्माच्या अनुष्ठानात

त्रुटि-विच्युतींच्या द्वारे बिंदुमात्र सुद्धा (थोडीही) विनाशाची संभावना नाही आहे." परंतु, येथे व्यवसायात्मिका बुद्धीच्या द्वारे सकाम भक्तियोगालाच लक्ष्य केले गेले आहे. दृष्टांताच्या द्वारे याला प्रमाणित करताना म्हणतात–'*यावान्*' इत्यादी. जातिवाचक संज्ञा (पारिभाषिक नाम) असल्यामुळे येथे 'उदपाने'चा प्रयोग (वापर) एकवचनात झाला आहे. म्हणून 'उदपाने'चा अर्थ है–'कूपसमूह' (विहिरींचा समूह). कूपसमूहाद्वारे कितीतरी प्रयोजन (उद्देश्य, हेतू) सिद्ध होतात, अर्थात एखादी विहीर शौच-कर्मासाठी, एखादी विहीर दन्त-धावनासाठी (दात साफ करण्यासाठी), एखादी विहीर वस्त्र धुण्यासाठी, एखादी विहीर केश-मार्जनासाठी (केस धुण्यासाठी), एखादी विहीर पाणी पिण्यासाठी प्रयोगात (वापरात) येते. उपरोक्त जितक्या प्रकारचे प्रयोजन (उद्देश्य) अलग-अलग कूपांनी (विहीरींनी) पूर्ण होतात, ते सर्व प्रयोजन विशाल सरोवराने एक सोबत पूर्ण होऊन जातात. अलग-अलग कूपांच्या (विहिरींच्या) निकट गेल्याने श्रम होतात, परंतु विशाल सरोवरात श्रम होत नाही. याच्या व्यतिरिक्त कूपाचे जल (विहिरीचे पाणी) खारे देखील असते, परंतु सरोवराचे जल सुरस (चवदार, रुचकर, स्वादिष्ट) असते–कूप आणि सरोवराचे हे पार्थक्य ध्यान देण्याजोगे आहे. अशा प्रकारे वेदांमध्ये वर्णित विभिन्न देवतांच्या पूजेने जे फळ प्राप्त होते, ते सर्व फळ केवल भगवत्-आराधनेद्वारेच प्राप्त होऊन जाते. 'ब्राह्मणस्य'चा अर्थ है–जो ब्रह्म (वेद) जाणतो. म्हणून ब्राह्मणच वेदांचे ज्ञाता आहेत. परंतु, वेदज्ञ असूनही जे विशेषरूपाने हे जाणतात की भक्तीच वेदाचे तात्पर्य आहे, तेच यथार्थ ब्राह्मण आहेत. श्रीमद्-भागवतात देखील म्हटले आहे–

*'ब्रह्मवर्चसकामस्तु यजेत् ब्रह्मणस्पतिम्।*
*इन्द्रमिन्द्रियकामस्तु प्रजाकामः प्रजापतीन्॥'*

(श्रीमद्भा. २/३/२)

अर्थात्, ब्रह्मतेजकामी व्यक्ती वेदपती ब्रह्मदेवांची, इंद्रिय-तृप्तिकामी व्यक्ती इंद्रांची, पुत्रादीची कामना असणारे प्रजापतींची आणि श्रीकामी (धनाची कामना करणारी) व्यक्ती दुर्गेची आराधना करोत. असे म्हटल्यावर पुन्हा म्हणतात–

*'अकामः सर्वकामो वा मोक्षकाम उदारधीः।*
*तीव्रेण भक्तियोगेन यजेत पुरुषं परम्॥'*

(श्रीमद्भा. २/३/१०)

अर्थात् कोणी निष्कामी (कोणतीही कामना नसणारा), सर्वकामी (सर्व कामना मनात बाळगणारा) अथवा उदार बुद्धी असणारा मोक्षकामी (मोक्ष किंवा मुक्तीची कामना करणारा) देखील असो, त्याने सुद्धा तीव्र भक्तियोगाच्या द्वारे परमपुरुषाचीच आराधना करायला हवी. ज्या प्रकारे मेघादिशून्य (ढग नसलेल्या स्वच्छ) आकाशात सूर्याची किरणे तीव्र होतात, त्या प्रकारे ज्ञान-कर्मादिशून्य (ज्ञान व कर्माने शून्य) भक्तियोगाला देखील तीव्र समजले पाहिजे. येथे बऱ्याचशा देवतांद्वारे विभिन्न कामनांची सिद्धी झाल्याने बहुबुद्धित्व होते. परंतु, केवळ भगवंतांद्वारेच सर्व कामना सिद्ध होऊन जातात-अशा बुद्धीच्या एका अंशालाच विषय-साद्‌गुण्य हेतू एकबुद्धीच्या रूपात जाणायला हवे॥ ४६॥

**सा. व. प्रकाशिका वृत्ती**-ज्या प्रकारे छोट्या-छोट्या कूपादी (विहीरी वगैरे) जलाशयांमध्ये पृथक-पृथक (वेगवेगळी) कर्मे (कामे) होऊनही ती समस्त कर्मे (कामे) एक बृहत्-जलाशयरूप (पाण्याचा मोठा संचय असलेल्या) सरोवरात सिद्ध होतात, त्याच प्रकार वेदोक्त (वेदांमध्ये सांगितलेल्या) भिन्न-भिन्न (वेगवेगळया) देवतांच्या आराधनेने भिन्न-भिन्न कामनांची पूर्ती होऊनही एकमात्र भगवंतांपासूच समस्त कामनांची सिद्धी होऊन जाते. नाना प्रकारच्या कामनांनी भरपूर (पूर्णतः भरलेल्या) हृदयाच्या कामनांच्या सिद्धीसाठी अनेक देवतांच्या उपासना केल्या जातात, यांच्यात अनेक शाखा (फांद्या) असणारी बुद्धी अव्यवसायात्मिका बुद्धी म्हणविली जाते. परंतु याच्या विपरीत एकनिष्ठ निश्चयात्मिका बुद्धीच्या द्वारे एकमात्र भगवंतांची ऐकान्तिकी उपासना सिद्ध होते. म्हणून वेदज्ञ पुरुष भक्तीलाच वेदाचे सार-तात्पर्य म्हणतात म्हणून भक्तियोगच व्यवसायात्मिका बुद्धी आहे.॥४६॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।**

**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि॥४७॥**

स्वधर्मविहित कर्म करण्यातच तुम्हाला अधिकार आहे, परंतु त्या कर्माच्या फळात तुम्हाला अधिकार नाही. तुम्ही स्वतःला कर्माच्या फळाचे कारण मानू नका आणि कधीही कर्म न करण्यात सुद्धा आसक्त होऊ नका॥४७॥

''कर्माच्या संबंधात तीन प्रकारचे विचार केले जातात–कर्म, अकर्म आणि विकर्म. यांच्यापैकी विकर्म अर्थात पापाचे आचरण आणि अकर्म अर्थात स्वधर्मोचित कर्म न करणे–हे दोन्हीही नितांत अमंगलजनक आहेत. तुमची या दोन्हीमध्ये अभिलाषा होऊ नये, म्हणून, तुम्ही विकर्म आणि अकर्माचा परित्याग करून सावधानीपूर्वक (सावध राहून) कर्माचे आचरण करावे. कर्म तीन प्रकारचे असते– नित्य कर्म, नैमित्तिक कर्म आणि काम्य कर्म. यांच्यातील काम्य कर्म अमंगलजनक आहे. जे काम्य कर्म करतात, ते कर्माच्या फळाचे हेतू (कारण) असतात. अतएव, मी तुमच्या भलाई साठी सांगतो आहे की कर्म करते वेळी तुम्ही कर्माच्या फळाचा हेतू बनू नका. स्वधर्मविहित कर्म करण्यात तुमचा अधिकार आहे, परंतु कोणत्याही कर्माच्या फळात तुमचा अधिकार नाही आहे. जे लोक योगाचे अवलंबन करतात, त्यांच्या साठी संसार–निर्वाह करण्याकरिता नित्य–नैमित्तिक कर्म स्वीकृत आहे.''–श्रीभक्तिविनोद ठाकुर. ॥४७॥

**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनञ्जय।**
**सिद्ध्यासिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते॥४८॥**

हे धनंजय! कर्मफलाची सफलता आणि असफलता (जय आणि पराजय) आणि कर्मात आसक्तीचा परित्याग करून भक्तियोगात युक्त होऊन समभावाने स्वधर्मविहित कर्म करा. कारण असा समत्वभावच योग म्हणविल्या जातो॥४८॥

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः॥४९॥**

हे धनंजय! कारण काम्य कर्म भगवदर्पित निष्काम कर्मयोगापेक्षा अत्यंतच निकृष्ट आहे, म्हणून तुम्ही निष्काम कर्मयोगाचा आश्रय ग्रहण करा. फलाची कामना करणारे कृपण असतात॥४९॥

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते।**
**तस्माद् योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्॥५०॥**

बुद्धियोगाने युक्त व्यक्ती या जन्मातच सुकृत आणि दुष्कृत—दोघांचाही परित्याग करते. म्हणून तुम्ही निष्काम कर्मयोगासाठी प्रयत्न करा. समभावासोबत बुद्धियोगाच्या आश्रयात कर्म करणेच कर्मयोगाचे कौशल आहे॥५०॥

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः।**
**जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम्॥५१॥**

बुद्धियोगाने युक्त पंडितजन कर्मजनित फळाचा त्याग करून जन्मबंधनातून मुक्त होऊन जातात आणि अनामय पद प्राप्त करतात॥ ५२॥

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च॥५२॥**

जेव्हा तुमची बुद्धी मोहरूप सघन वनास पार करून जाईल, तेव्हा तुम्ही ऐकण्यायोग्य आणि ऐकलेल्या विषयांप्रती वैराग्य प्राप्त कराल॥ ५२॥

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि॥५३॥**

जेव्हा तुमची बुद्धी नाना प्रकारच्या लौकिक आणि वैदिक अर्थांना ऐकण्यापासून विरक्त होऊन जाईल आणि अन्य आसक्तींनी रहित होऊन परमेश्वरात स्थिर होईल, तेव्हा तुम्ही योगफल लाभ कराल॥५३॥

**अर्जुन उवाच।**

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्॥५४॥**

अर्जुन म्हणाले–हे केशव! समाधीत स्थित स्थिर बुद्धी असणाऱ्या व्यक्तीचे काय लक्षण आहे? ती कशा प्रकारे बोलते, कशाप्रकारे बसते आणि कशाप्रकारे चालते?॥५४॥

**श्रीभगवानुवाच—**

**प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्।**
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते॥५५॥

श्री भगवान म्हणाले–हे पार्थ! जेव्हा ते मनाच्या समस्त कामनांचा परित्याग

करतात आणि निग्रह करीत मनातच आनंदस्वरूप आत्म्याद्वारे तुष्ट होतात, तेव्हा ते स्थितप्रज्ञ म्हणविले जातात॥५५॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते॥५६॥**

जे आध्यात्मिकादी तीन ताप उपस्थित झाल्यावर उद्विग्न होत नाही, सुख प्राप्त झाल्यावर सुखात स्पृहाहीन राहतात; राग, भय तथा क्रोधरहित असे मुनी स्थितप्रज्ञ म्हणवल्या जातात॥५६॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत् प्राप्य शुभाशुभम्।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥५७॥**

जो व्यक्ती सर्वत्र स्नेहरहित आहे आणि अनुकूलाच्या प्राप्तीने प्रसन्न होत नाही आणि प्रतिकूल प्राप्त झाल्यावर त्याच्याशी द्वेष करत नाही, त्याची बुद्धी स्थिर आहे॥५७॥

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥५८॥**

कासव ज्याप्रमाणे आपल्या अंगांना इच्छेनुसार आपल्या कवचाच्या आत घेते, त्याचप्रकारे जेव्हा हे मुनी आपल्या इंद्रियांना इंद्रियग्राह्य विषयांपासून दूर ओढतात, तेव्हा ते स्थितप्रज्ञ म्हणविले जातात॥५८॥

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते॥५९॥**

इंद्रियांच्या द्वारे विषयांना ग्रहण न करणाऱ्या देहाभिमानी व्यक्तीचे विषयसमूह तर निवृत्त होऊन जातात, परंतु विषयांप्रती त्याचे जे आकर्षण आहे, ते निवृत्त होत नाही. दुसरीकडे परमात्म्याच्या दर्शनाने स्थितप्रज्ञ व्यक्तिचा विषयांप्रती जे आकर्षण आहे, त्याचीपण निवृत्ती होऊन जाते॥५९॥

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः।**
**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः॥६०॥**

हे अर्जुन! कारण क्षोभ उत्पन्न करून टाकणारी ही इन्द्रिये मोक्षासाठी प्रयत्नशील विवेकी पुरुषाचेही मन बलपूर्वक हरण करतात॥ ६०॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः।**

**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥६१॥**

यासाठी ते माझे परायण भक्तियोगी होऊन इंद्रियांना संयमित करून माझे आश्रित होऊन अवस्थान करतात. कारण, ज्यांची इन्द्रिये वशात आहेत, त्यांचीच बुद्धी स्थिर आहे अर्थात तेच स्थितप्रज्ञ आहेत॥६१॥

**ध्यायतो विषयान् पुंसः सङ्गस्तेषूपजायते।**
**सङ्गात् संजायते कामः कामात् क्रोधोऽभिजायते॥६२॥**

शब्दादी विषयांचे निरंतर चिंतन केल्याने त्या विषयांत चिंतनकारी पुरुषाची आसक्ती उत्पन्न होते. आसक्तीने काम आणि कामाने क्रोधाची उत्पत्ती होते॥६२॥

**क्रोधाद्भवति सम्मोहः सम्मोहात् स्मृतिविभ्रमः।**
**स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात् प्रणश्यति॥२-६३॥**

क्रोधाने सम्मोह (काय करावे आणि काय न करावे याच्या विवेकाचा अभाव), सम्मोहाने स्मृतीचा नाश (अर्थात शास्त्राच्या उपदेशांना विसरून जाणे), स्मृतिनाश झाल्याने बुद्धीचा नाश आणि बुद्धिनाश झाल्याने सर्वनाश होतो अर्थात तो पुन्हा भवसागरात पतित होऊन जातो॥६३॥

**रागद्वेषविमुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन्।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति॥६४॥**

परंतु, संयमित पुरुष राग-द्वेषाने रहित होऊन आपल्या वशात केलेल्या इंद्रियांद्वारे यथायोग्य विषयांना भोगूनही प्रसन्नता प्राप्त करतात॥६४॥

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते॥६५॥**

प्रसन्नता प्राप्त झाल्यावर त्या विधेयात्मा पुरुषाची सगळी दुःखे दूर होऊन जातात आणि त्या प्रसन्नचित्त व्यक्तीची बुद्धी शीघ्रच सर्वतोभावेन अभीष्ट-प्राप्तीत स्थिर होऊन जाते॥६५॥

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना।**
**न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम्॥६६॥**

अवशीभूत मन असलेल्या पुरुषाची आत्मविषयिणी बुद्धी नसते. अशा बुद्धिहीन पुरुषाला परमेश्वराचे ध्यान होत नाही आणि ध्यानरहित व्यक्तीला शांती मिळत नाही. अशांत व्यक्तीला भले सुख कुठे

मिळेल? ॥६६॥

**इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि॥६७॥**

ज्याप्रकारे वायू पाण्यात स्थित नावेचे हरण करतो, त्याचप्रकारे अजितेंद्रिय व्यक्तीचे मन विषयात विचरण करणाऱ्या ज्या कोण्या इंद्रियाकडे अनुधावित होते, ते त्या इंद्रियांच्या अनुवर्ती होऊन त्याच्या बुद्धीचे हरण करते॥६७॥

**तस्माद् यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता॥६८॥**

म्हणून हे महाबाहो! ज्याची इंद्रिये इंद्रियग्राह्य विषयांत सर्व प्रकारे निगृहीत आहेत, त्यांची बुद्धी स्थिर आहे आणि ते स्थितप्रज्ञ आहेत॥ ६८॥

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः॥६९॥**

जी आत्मविषयिणी बुद्धी जडमुग्ध सर्वसाधारण जीवांसाठी रात्रिसमान आहे, स्थितप्रज्ञ व्यक्ती त्यात जागृत राहतात, आणि ज्या विषय–प्रवणा बुद्धीत साधारण जीव जागृत राहतात, तत्त्वदर्शी मुनीसाठी तीच रात्रीसमान आहे अर्थात ते निर्लिप्तभावाने यथायोग्य विषय स्वीकार करतात॥६९॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत्।**
**तद्वत् कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी॥७०॥**

ज्याप्रकारे अनेक नदींचे जल परिपूर्ण आणि अचल प्रतिष्ठा असलेल्या समुद्रात विना कोण्या क्षोभ उत्पन्न करताच प्रवेश करते, त्याचप्रकारे सर्व कामना स्थितप्रज्ञ पुरुषात विना कोणता विकार उत्पन्न करताच त्यात प्रविष्ट होतात. ते (स्थितप्रज्ञ)च शांती प्राप्त करतात, न की आपल्या कामनांना पूर्ण करणारे इच्छुक व्यक्ती॥७०॥

**विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः।**
**निर्ममो निरहङ्कारः स शान्तिमधिगच्छति॥७१॥**

जे पुरुष सर्व कामनांचा त्याग परित्याग करून स्पृहाशून्य, अहंकाररहित आणि ममताशून्य होऊन विचरण करतात, ते शांती

प्राप्त करतात ॥७१ ॥

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति।**
**स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति॥७२ ॥**

हे पार्थ! अशा प्रकारे ब्रह्मप्राप्तीच्या स्थितीला ब्राह्मी स्थिती म्हटले जाते. या स्थितीला प्राप्त केल्यावर कोणी पण मोहित होत नाही. मृत्युकाळात क्षणमात्रसुद्धा यात स्थित झाल्यावर ब्रह्मनिर्वाण प्राप्त होते॥ ७२ ॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'सांख्ययोगो' नाम द्वितीयोऽध्यायः।**

॥दुसरा अध्याय समाप्त॥

# अध्याय ३

## तृतीयोऽध्यायः

**अर्जुन उवाच–**

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन।**
**तत् किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव॥१॥**

अर्जुन म्हणाला–हे जनार्दन! जर आपल्याला गुणातीता भक्ति–विषयिणी बुद्धी कर्मापेक्षा श्रेष्ठ मान्य आहे, तर हे केशव! आपण मला या घोर युद्धरूप कर्मात का नियोजित करता आहात?॥१॥

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥२॥**

आपल्या नाना अर्थबोधक वाक्यांद्वारे माझी बुद्धी जणू काही मोहित होते आहे. म्हणून आपण त्या एकच गोष्टीला निश्चयपूर्वक सांगावे ज्याद्वारे की माझे कल्याण होईल॥२॥

**श्रीभगवानुवाच–**

**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्॥३॥**

श्रीभगवान म्हणाले–हे निष्पाप अर्जुन! मी पहिलेच प्रकृष्टरूपात सांगितले आहे की या लोकांत दोन प्रकारची निष्ठा (नित्य स्थिती) असते–सांख्यवादी ज्ञानी जनांची निष्ठा ज्ञानयोगाद्वारा आणि योगी जनांची निष्ठा कर्मयोगाद्वारा होते॥३॥

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति॥४॥**

शास्त्रीय कर्मांच्या अनुष्ठानांना पार न पाडल्याने पुरुष नैष्कर्म्यरूप ज्ञान प्राप्त करू शकत नाही आणि केवळ कर्मांच्या त्यागाने सुद्धा अशुद्ध चित्त असणारा पुरुष सिद्धी प्राप्त करू शकत नाही॥४॥

**न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः॥५॥**

कोणी पुरुष कोण्या काळात एक क्षणासाठीदेखील विना कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. सर्व पुरुष स्वभावाने उत्पन्न राग–द्वेष इत्यादी गुणांच्या अधीन होऊन कर्मात प्रवृत्त होतात॥५॥

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्।**
**इन्द्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते॥६॥**

जी मूढ व्यक्ती आपल्या कर्मेन्द्रियांना संयमित करून (जबरदस्तीने थांबवून) मनातल्या मनात इंद्रियांच्या विषयांचे स्मरण करते, ती मिथ्याचारी (दांभिक) म्हणविल्या जाते॥६॥

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते॥७॥**

हे अर्जुन! परंतु जी व्यक्ती मनाद्वारे इंद्रियांना वश करून फळाची आकांक्षा सोडून कर्मेंद्रियांनी शास्त्रविहित आचरण करते, ती श्रेष्ठ आहे॥७॥

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः।**
**शरीरयात्रापि च ते न प्रसिध्येदकर्मणः॥८॥**

तुम्ही संध्या-उपासना इत्यादी नित्य कर्म करा, कारण कोणतेही कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे आणि कोणतेही कर्म न केल्याने तर तुमचा शरीर-निर्वाहसुद्धा सिद्ध होऊ शकणार नाही॥८॥

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर॥९॥**

हे कुंतीनंदन! श्रीविष्णूंसाठी अर्पित निष्काम कर्माव्यतिरिक्त अन्य कर्मांद्वारा मनुष्याला कर्मबंधन प्राप्त होते. म्हणून तुम्ही फळाची आकांक्षा सोडून भगवान विष्णूंच्या उद्देशाने कर्माचे उत्तम रितीने आचरण करा॥९॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक्॥१०॥**

आदि काळात (सृष्टीच्या प्रारंभी) यज्ञाधिकारी ब्राह्मणांची सृष्टी करून प्रजापती ब्रह्मा म्हणाले-तुम्ही लोक या यज्ञाद्वारे वृद्धी प्राप्त करा आणि हा यज्ञ तुम्हा लोकांचा अभीष्ट कामनांना पूर्ण करणारा होवो॥१०॥

**देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ॥११॥**

या यज्ञाद्वारे तुम्ही लोक देवतांचे प्रीति-विधान करा आणि देवतागण

फळ प्रदान करून तुम्हा लोकांना प्रसन्न करतील. अशा प्रकारे एक दुसऱ्याला प्रसन्न करीत परम कल्याण प्राप्त कराल॥११॥

**इष्टान् भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः॥१२॥**

देवतागण प्रसन्न होवून तुम्हा लोकांच्या अभीष्ट भोगांना प्रदान करतील. म्हणून जी व्यक्ती देवतांद्वारे प्रदत्त द्रव्यांना देवतांना अर्पित केल्याविनाच भोग करते, ती चोरच आहे॥१२॥

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्॥१३॥**

यज्ञाच्या अवशिष्टाला ग्रहण करणारा साधू सर्व पापांपासून मुक्त होऊन जातो, परंतु जो केवळ आपल्यासाठीच अन्न इत्यादी शिजवतो, तो दुराचारी पापालाच खातो॥१३॥

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः॥१४॥**

सर्व जीव अन्नापासून उत्पन्न होतात आणि अन्नाची उत्पत्ती पावसापासून होते. यज्ञामुळे पाऊस होतो आणि यज्ञ कर्माने उत्पन्न होतो॥१४॥

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्॥१५॥**

कर्मांना वेदापासून उत्पन्न जाणा आणि वेदाला अच्युतापासून उत्पन्न जाणा. म्हणून सर्वव्यापक ब्रह्म सर्वदाच यज्ञात प्रतिष्ठित आहे॥१५॥

**एवं प्रवर्त्तितं चक्रं नानुवर्त्तयतीह यः।**
**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति॥१६॥**

हे पार्थ! जी व्यक्ती या प्रकारच्या प्रवर्तित कर्मचक्राचे आचरण करत नाही, ती पापरत आणि इन्द्रियासक्त होऊन व्यर्थच जीवित राहते॥ १६॥

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।**
**आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते॥१७॥**

परंतु, जी व्यक्ती आत्माराम आहे आणि आत्म्यातच तृप्त राहाणारी आहे, तिच्या साठी कोणतेही कर्तव्य कर्म नाही आहे॥१७॥

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः॥१८॥**

आत्माराम पुरुषाला या जगात कर्माच्या अनुष्ठानाने पुण्य प्राप्त होत नाही आणि कर्माचे अनुष्ठान न केल्याने कोणता दोष सुद्धा लागत नाही. त्यांना आपल्या प्रयोजनासाठी या ब्रह्मांडात समस्त जीवांमध्ये कोणत्याही आश्रयाची आवश्यकता नाही॥१८॥

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर।**
**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः॥१९॥**

म्हणून तुम्ही अनासक्त होऊन निरंतर कर्माचे आचरण करा, कारण अनासक्त होऊन कर्माचे आचरण केल्याने पुरुष मोक्ष प्राप्त करू शकतो॥१९॥

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः।**
**लोकसंग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि॥२०॥**

जनक इत्यादी राजर्षींनी देखील कर्माच्याद्वारेच परम सिद्धीला प्राप्त केले होते. म्हणून लोकशिक्षणाच्या दृष्टिकोणातून देखील कर्म करणेच तुमच्यासाठी उचित आहे॥२०॥

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते॥२१॥**

श्रेष्ठ लोक जसे आचरण करतात, अन्य लोकदेखील तसेच आचरण करतात. ते जे काही प्रमाणित करतात, अन्य लोकदेखील त्याचेच अनुवर्त्तन करतात॥२१॥

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त्त एव च कर्मणि॥२२॥**

हे पार्थ! जरी माझ्यासाठी काहीच करणीय कर्म नाही आहे, कारण माझ्यासाठी तिन्ही लोकांत काहीच अप्राप्त आणि प्राप्त करण्यायोग्य नाही आहे, तरीही मी कर्मात प्रवृत्त आहे॥२२॥

**यदि ह्यहं न वर्त्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः।**
**मम वर्त्मानुवर्त्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥२३॥**

हे पार्थ! जर मी सावधानीपूर्वक कर्मात प्रवृत्त झालो नाही, तर निश्चितच सर्व मनुष्य सर्वतोभावेन माझ्या पथाचे अनुकरण करतील॥

२३॥

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्।**
**सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः॥२४॥**

जर मी कर्म नाही केले तर, सर्व लोक भ्रष्ट होऊन जातील आणि मी वर्ण संकराचा प्रवर्तक बनेल. अशा प्रकारे मीदेखील या सर्व प्रजांच्या नाशाचे कारण बनेल॥२४॥

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।**
**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम्॥२५॥**

हे भारत! कर्मात आसक्त अज्ञानी लोक ज्या प्रकारे कर्म करतात, लोकशिक्षणाचे इच्छुक ज्ञानी व्यक्तीदेखील त्याचप्रकारे अनासक्त होऊन कर्म करतील॥२५॥

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम्।**
**योजयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन्॥२६॥**

ज्ञानयोगाचे उपदेशक अज्ञ व्यक्तींना हा उपदेश देऊन त्यांच्या बुद्धीत भ्रम उत्पन्न नाही करणार की कर्म त्याग करून ज्ञानाचा अभ्यास करा, उलट समाहित चित्ताने (अनासक्त होऊन) स्वयं सर्व कर्मांना योग्यरीतीने आचरण करीत अज्ञ व्यक्तींनादेखील कर्मात नियुक्त करतील॥२६॥

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः।**
**अहङ्कारविमूढात्मा कर्त्ताहमिति मन्यते॥२७॥**

सर्व प्रकारचे कर्म प्रकृतीच्या गुणांद्वारे केले जाते, परंतु अहंकाराने मोहित चित्त असणारा व्यक्ती असे मानतो की मी कर्ता आहे॥२७॥

**तत्त्ववित् तु महाबाहो गुणकर्मविभागयोः।**
**गुणा गुणेषु वर्त्तन्त इति मत्वा न सज्जते॥२८॥**

हे महाबाहो अर्जुन! जो या तथ्याशी परिचित आहे की आत्मा गुण आणि कर्मापासून पृथक आहे, तो तत्त्व जाणणारा पुरुष कर्तापणाचा अभिमान करीत नाही. कारण, तो असे मानतो की इन्द्रिये तर आपापल्या विषयांत रत आहेत, परंतु मी त्यांच्यापेक्षा वेगळा आहे॥ २८॥

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु।**

**तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत्॥२९॥**

प्राकृत गुणांमध्ये आविष्ट पुरुष विषयांमध्ये आसक्त होतात. जो सर्वज्ञ आहे, तो त्या अज्ञ आणि मंद बुद्धीच्या व्यक्तींना विचलित करीत नाहीत॥२९॥

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा।**
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः॥३०॥

आत्मनिष्ठ चित्ताने सर्व कर्म मला समर्पित करीत निष्काम, ममताशून्य आणि शोकरहित होऊन युद्ध करा॥३०॥

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः॥३१॥**

जे सर्व श्रद्धावान आणि दोषदृष्टीने रहित व्यक्ती माझ्या या अभिप्रायाचे (निष्काम-कर्मयोगा) चे नित्य अनुसरण करतात, ते देखील कर्माच्या बंधनातून मुक्ती लाभ करतात॥३१॥

**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम्।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः॥३२॥**

परंतु, जे दोषारोप करत माझ्या या मताचे अनुवर्तन करीत नाहीत, तुम्ही त्या सर्वांना विवेकरहित, समस्त प्रकारच्या ज्ञानांपासून वंचित आणि सर्वपुरुषार्थातून भ्रष्ट जाणा॥३२॥

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति॥३३॥**

विवेकवान व्यक्तीसुद्धा आपल्या स्वभावानुसार कृती करतात. सर्व जीव प्रकृतीचेच अनुगमन करतात. म्हणून इन्द्रियनिग्रह काय करेल?॥३३॥

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ॥३४॥**

प्रत्येक इंद्रियाचा आपापल्या विषयाप्रती राग आणि द्वेष अवश्यंभावी आहे, म्हणून तुम्ही त्यांच्या अधीन होऊ नका, कारण राग आणि द्वेष साधकांच्या कल्याणाच्या विरोधी आहेत॥३४॥

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात्।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः॥३५॥**

उत्तमरीत्या अनुष्ठित परधर्मापेक्षा किंचित दोषयुक्त स्वधर्म श्रेष्ठ आहे.

आपापल्या वर्णाश्रमोचित स्वधर्माच्या पालनात मरून जाणेही चांगले आहे, परंतु परधर्म भयावह आहे॥३५॥

**अर्जुन उवाच–**

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापञ्चरति पूरुषः।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः॥३६॥**

अर्जुन म्हणाले–हे कृष्ण! मग हा पुरुष कोणाद्वारे प्रेरित होऊन न इच्छितासुद्धा बलपूर्वक नियोजित झाल्यासारखा पापाचे आचरण करतो॥ ३६॥

**श्रीभगवानुवाच–**

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्॥३७॥**

श्री भगवान म्हणाले–हा कामच क्रोधात परिणत होतो आणि रजोगुणाने उत्पन्न सर्वभक्षी आणि अतिशय उग्र या कामालाच जीवाचा प्रधान शत्रू जाणा॥३७॥

**धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम्॥३८॥**

ज्याप्रकारे आग धुराने, दर्पण (आरसा) धुळीने आणि गर्भ जरायूने (वारेने) आवृत राहतो, त्याचप्रकारे हे ज्ञान कामाने आवृत राहते॥ ३८॥

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा।**
**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च॥३९॥**

हे अर्जुन! या कधीही न पूर्ण होणाऱ्या अग्नी समान कामरूप चिरशत्रूने ज्ञानी व्यक्तीचे ज्ञान आवृत आहे॥३९॥

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्॥४०॥**

इन्द्रिये, मन आणि बुद्धी या कामाची आश्रयस्थळे म्हणविली जातात. हा काम यांच्याद्वारे ज्ञानाला आच्छादित करून जीवाला विमोहित करतो॥४०॥

**तस्मात् त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ।**
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्॥४१॥

म्हणून हे अर्जुन! तुम्ही सर्वप्रथम इन्द्रियांना वशीभूत करून ज्ञान आणि विज्ञानाला नाश करणाऱ्या पापरूप या कामाला विनष्ट करा॥ ४१ ॥

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः।**
**मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेर्यः परतस्तु सः॥४२॥**

इन्द्रियांना श्रेष्ठ म्हटले जाते. मन इन्द्रियांपेक्षा श्रेष्ठ आहे, परंतु बुद्धी मनापेक्षाही श्रेष्ठ आहे आणि जो बुद्धीपेक्षाही श्रेष्ठ आहे, तो आत्मा आहे॥४२॥

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्॥४३॥**

हे महाबाहो! अशाप्रकारे जीवात्म्याला बुद्धीपेक्षाही श्रेष्ठ जाणून आणि बुद्धीद्वारे मनाला वशात करून कामरूप शत्रूला विनष्ट करा॥४३॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि
श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु
ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'कर्मयोगो' नाम तृतीयोऽध्यायः॥

**॥तिसरा अध्याय समाप्त॥**

# अध्याय ४
## चतुर्थोऽध्यायः

**श्रीभगवानुवाच।**

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम्।**
**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्॥१॥**

श्रीभगवान म्हणाले–मी हा अविनाशी योग सूर्याला सांगितला होता, सूर्याने मनूला सांगितला आणि मनूने इक्ष्वाकूला सांगितला॥१॥

**एवं परम्पराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परन्तप॥२॥**

हे अर्जुन! अशा प्रकारे परंपरेने प्राप्त या योगाला राजर्षींनी जाणले, परंतु बऱ्याच वेळ झाल्याने तो योग या लोकात नष्टप्राय झाला आहे॥२॥

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम्॥३॥**

तुम्ही माझे भक्त आणि सखा आहात, म्हणून हा तोच पुरातन योग माझ्याद्वारे तुम्हाला सांगितला गेला आहे, कारण हे उत्तम रहस्य आहे॥३॥

**अर्जुन उवाच–**

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति॥४॥**

अर्जुन म्हणाले – आपला जन्म तर आत्ता झाला आहे आणि सूर्याचा जन्म प्राचीनकाळात झाला आहे. म्हणून मी या गोष्टीला कसे समजू की आपणच पूर्वकाळात सूर्याला हा योग सांगितला होता॥४॥

**श्रीभगवानुवाच–**

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप॥५॥**

श्रीभगवान म्हणाले–हे परंतप अर्जुन! तुमचे आणि माझे बरेच जन्म व्यतीत झाले आहेत. मी त्या सर्वांना जाणतो, परंतु तुम्ही त्यांना जाणत नाही॥५॥

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय सम्भवाम्यात्ममायया॥६॥**

अजन्मा, अविनाशी, आणि समस्त जीवांचा ईश्वर असूनही मी आपल्या योगमायेच्या द्वारा आपल्या सच्चिदानंद –स्वरूपाचे अवलंबन करून आविर्भूत होतो॥६॥

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥७॥**

हे भारत! जेव्हा जेव्हा धर्माची हानी आणि अधर्माची वृद्धी होते, तेव्हा तेव्हा मी आपल्या नित्यसिद्ध देहाला प्रकट करतो॥७॥

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।**
**धर्मसंस्थापनार्थाय सम्भवामि युगे युगे॥८॥**

मी आपल्या एकांत भक्तांचे परित्राण, दुष्टांचा विनाश आणि धर्माच्या संस्थापनेसाठी युगायुगात आविर्भूत होतो.॥८॥

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन॥९॥**

हे अर्जुन! माझे जन्म आणि कर्म अप्राकृत आहेत, जो हे यथार्थरूपात जाणून घेतो, ते वर्तमान शरीरास त्यागून पुन्हा जन्म ग्रहण करत नाहीत, परंतु मलाच प्राप्त करतात॥९॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥१०॥**

राग, भय आणि क्रोधशून्य होऊन, माझ्यात एकाग्रचित्त होऊन आणि मला शरणागत होऊन ज्ञानरूपी तपस्येने पवित्र अनेक भक्तांनी माझी प्रेमाभक्ती प्राप्त केली आहे॥१०॥

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥११॥**

हे पार्थ! जे मनुष्य ज्या प्रकारे माझे भजन करतात, मीपण त्यांचे त्याचप्रकारे भजन करतो, कारण सर्व मनुष्य सर्व प्रकारे माझ्याच मार्गाचे अनुसरण करतात॥११॥

**काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा॥१२॥**

कर्माच्या फळाची अभिलाषा करणारे या लोकात देवतांची पूजा करतात, कारण कर्मांद्वारे उत्पन्न होणारे फळ लवकर प्राप्त होते॥ १२॥

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम्॥१३॥**

गुण आणि कर्माच्या विभागाद्वारे ब्राह्मण इत्यादी चार प्रकारचे वर्णसमूह मी रचले आहेत. त्यांच्या कर्ता असूनही तुम्ही मला अविनाशीला अकर्ताच जाणा॥१३॥

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते॥१४॥**

मी कर्मांनी लिप्त होत नाही, कारण कर्मफलात माझी स्पृहा नसते. अशा प्रकारे जो मला तत्त्वतः जाणतो तो कधीच कर्मांनी आबद्ध होत नाही॥१४॥

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः।**
**कुरु कर्मैव तस्मात् त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्॥१५॥**

पूर्वकालीन मुमुक्षूगणाने देखील असेच जाणून लोक-प्रवर्तनासाठी कर्म केले आहे. म्हणून तुम्हीदेखील प्राचीन पुरुषांद्वारे पुरातन कालात अनुष्ठित कर्मांना करा॥१५॥

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥१६॥

कर्म काय आहे आणि अकर्म काय आहे–विवेकी पुरुषदेखील या विषयामध्ये मोहित होऊन जातात. म्हणून मी तुम्हाला ते कर्म तत्त्व सांगेन. ज्याला जाणून तुम्ही या अमंगलपूर्ण संसारातून मुक्त होवून जाल॥१६॥

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यञ्च विकर्मणः।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः॥१७॥

कर्म, विकर्म आणि अकर्माला जाणले पाहिजे, कारण कर्माचे तत्त्व अतिशय दुर्गम आहे॥१७॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः।**
**स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्॥१८॥**

जो कर्मात अकर्माला आणि अकर्मात कर्म पाहतो, तो मनुष्यांमध्ये बुद्धिमान, योगी आणि समस्त कर्मांचा कर्ता आहे॥१८॥

**यस्य सर्वे समारम्भाः कामसङ्कल्पवर्जिताः।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः॥१९॥**

ज्यांचे सर्व कर्म कामना आणि संकल्पांनी रहित आहेत आणि ज्ञानरूप अग्नीने दग्ध झाले आहेत, त्यांना ज्ञानिजनसुद्धा पंडित म्हणतात॥१९॥

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः॥२०॥**

जे कर्मफलात आसक्तीचा परित्याग करून आपल्या नित्य आनंदात परितृप्त आहेत आणि योगक्षेमाच्या आश्रयासाठी प्रयत्न करत नाही, ते कर्मात योग्यरीतीने प्रवृत्त होऊन ही काहीच करू शकत नाही॥२०॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥४-२१॥**

ज्यांचे चित्त आणि देह संयत आहेत आणि जे कामनाशून्य आहेत, ज्यांनी सर्व प्रकारच्या भोग-सामग्रींचा परित्याग केला आहे, असे पुरुष केवळ शरीराच्या रक्षणासाठीच कर्म करीतसुद्धा पापग्रस्त होत नाहीत॥२१॥

**यदृच्छालाभसन्तुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते॥२२॥**

जो अयाचित (न मागता) प्राप्त द्रव्याने परितुष्ट, शीत-उष्णादी द्वंद्व विषयांत सहनशील, मत्सरतारहित, आणि सिद्धी आणि असिद्धीत समभावाने राहतात, ते कर्म करून सुद्धा बंधनाला प्राप्त होत नाहीत॥२२॥

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते॥२३॥**

जे आसक्तिरहित आहेत, मुक्त झाले आहेत, ज्यांचे चित्त ज्ञानात स्थित आहे, परमेश्वराच्या आराधनेसाठी कर्माचे आचरण करणाऱ्या अशा पुरुषाचे संपूर्ण कर्म ठीक प्रकारे विलीन होऊन जाते अर्थात अकर्म भावास प्राप्त होते॥२३॥

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना॥२४॥**

ज्या यज्ञात अर्पण अर्थात स्रुवा इत्यादी ब्रह्म आहे, घृत इत्यादी हवन सामग्री सुद्धा ब्रह्म आहे, त्यामध्ये ब्रह्मरूप होता(कर्ता) द्वारे आहुतिरूपी क्रियादेखील ब्रह्म आहे. ब्रह्मरूप कर्मात एकाग्रचित्त त्या व्यक्तीच्या द्वारे ब्रह्मच प्राप्त करण्याजोगे (फळ) आहे॥२४॥

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति॥२५॥**

अन्य कर्मयोगिगण देवतांच्या पूजनरूप देवयज्ञाची उत्तमप्रकारे उपासना करतात आणि ज्ञानयोगिगण ब्रह्मरूप अग्नीत यज्ञाद्वारेच यज्ञाची आहुती

प्रदान करतात॥२५॥

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति।**
**शब्दादीन् विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति॥२६॥**

नैष्ठिक ब्रह्मचारिगण मनःसंयमरूप अग्नीत कर्ण इत्यादी इंद्रियांची आहुती देतात आणि गृहस्थगण इंद्रियरूप अग्नीत शब्द इत्यादी विषयांची आहुती देतात॥२६॥

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते॥२७॥**

अन्य योगिगण ज्ञानाद्वारे प्रकाशित आत्मसंयम योगरूप अग्नीत सर्व इंद्रियांच्या क्रियांची आणि प्राणांच्या क्रियांची आहुती देतात॥२७॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः॥२८॥**

कोणी कोणी द्रव्यदानरूप यज्ञ करतात, कोणी कोणी तपस्यारूप यज्ञ करतात, कोणी कोणी योगरूप यज्ञ करतात आणि कोणी कोणी वेदाध्ययन आणि याच्या ज्ञानरूप यज्ञास करतात. हे सर्व प्रयत्नशील व्यक्ती तीक्ष्णव्रत करणारे आहेत॥२८॥

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः।**
**अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुह्वति॥२९॥**

प्राणायामनिष्ठ व्यक्ती अपान वायूत प्राणवायूची आहुती देतात, अशा प्रकारे प्राणवायूत अपानवायूची आहुती देतात आणि प्राणाला आणि अपानाला थांबवून प्राणायामपरायण होतात. कोणी-कोणी संयमी पुरुष प्राणांत प्राणांची आहुती देतात॥२९॥

**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षयितकल्मषाः।**
**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्॥३०॥**

हे सर्व यज्ञाचे ज्ञाता आहेत आणि यज्ञाद्वारे पापरहित होऊन यज्ञावशेषरूप अवशिष्ट अमृताचा भोग करून सनातन ब्रह्मास प्राप्त होतात॥३०॥

**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम॥३१॥**

हे कुरुश्रेष्ठ! यज्ञ न करणाऱ्यांसाठी तर हा अल्प सुखविशिष्ट मनुष्य

लोक सुद्धा प्राप्य नाही, तर भले मग अन्य देव इत्यादी लोक कशा प्रकारे प्राप्त होऊ शकतात॥३१॥

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे॥३२॥**

अशा प्रकारे अनेक यज्ञ वेदा द्वारे विस्तृत रूपात वर्णित झाले आहेत, तुम्ही या सर्वांना कर्मजनित जाणा. अशा प्रकारे जाणून तुम्ही मुक्ती प्राप्त कराल॥३२॥

**श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते॥३३॥**

हे परंतप पार्थ! ज्ञानयज्ञ द्रव्यमय यज्ञापेक्षा श्रेष्ठ आहे, कारण समस्त कर्म अव्यर्थरूप ज्ञानात समाप्त होतात॥३३॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥३४॥**

ज्ञानाचा उपदेश देणाऱ्या गुरूच्या निकट दंडवत प्रणामाद्वारे, संगत प्रश्नाद्वारे आणि सेवेद्वारे त्या ज्ञानास समजा. तत्त्वदर्शी ज्ञानिगण तुम्हाला त्या ज्ञानाचा उपदेश करतील॥३४॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव।**
**येन भूतान्यशेषाणि द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि॥३५॥**

या ज्ञानाला जाणून तुम्ही परत मोहित होणार नाही आणि ज्ञानाच्या द्वारे तुम्ही निखिल जीवांना आत्म्यात आणि त्या ज्ञानाच्या द्वारे तुम्ही निखिल (सर्व) जीवांना आत्म्यात आणि नंतर माझ्या परमात्म्यात दर्शन कराल॥३५॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि॥३६॥**

जरी तुम्ही समस्त पापींमध्ये देखील अतिशय पाप करणारे असाल, तरीही या ज्ञानरूपी नौकेचा आश्रय करून तुम्ही संपूर्ण पापसमुद्रातून तरून जाल॥३६॥

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा॥३७॥**

हे अर्जुन! ज्या प्रकारे प्रज्वलित अग्नी काष्ठ (लाकूड) इत्यादी

इंधनाला भस्म करून टाकतो, त्याचप्रकारे ज्ञानरूप अग्नी सर्व कर्मांना भस्म करून टाकतो॥३७॥

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति॥३८॥**

या लोकात ज्ञानाच्या सदृश पवित्र आणखी काही नाही आहे. निष्काम कर्मयोगाने सम्यक सिद्ध व्यक्ती त्या ज्ञानाला कालक्रमाने स्वतःच आपल्या हृदयात प्राप्त करते॥३८॥

**श्रद्धावान् लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति॥३९॥**

श्रद्धावान, जितेंद्रिय तथा साधनपरायण व्यक्ती ज्ञान प्राप्त करते आणि ज्ञानाला प्राप्त करून संसारनाशरूपी परम शांती प्राप्त करते॥३९॥

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः॥४०॥**

अज्ञ, श्रद्धाविहीन आणि संशययुक्त व्यक्ती विनाशाला प्राप्त होते. संशययुक्त व्यक्तीसाठी न हा लोक आहे, न पर लोक आहे आणि सुख पण नाही आहे॥४०॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम्।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय॥४१॥**

हे धनंजय! ज्यांनी निष्काम कर्मयोगाद्वारे संन्यासविधीने कर्मत्याग केला, ज्ञानाद्वारे संशयाचा नाश केला आहे आणि आत्मस्वरूपाला उपलब्ध केले आहे, त्यांना कर्मसमूह बांधत नाहीत॥४१॥

**तस्मादज्ञानसम्भूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत॥४२॥**

म्हणून हे भारत! तुम्ही आपल्या हृदय-स्थित या अज्ञानजनित संशयाला ज्ञानरूपी तलवारीने छेदून निष्काम कर्मयोगाचा आश्रय करीत युद्धाला उभे राहा॥४२॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि**
**श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**
**ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'ज्ञानयोगो' नाम**
**चतुर्थोऽध्यायः।**

# अध्याय ५

## पञ्चमोऽध्यायः

**अर्जुन उवाच—**

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगञ्च शंससि।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्॥१॥**

अर्जुन म्हणाले – हे कृष्ण! आपण कर्मसंन्यासाची गोष्ट सांगून पुन्हा कर्मयोगाची प्रशंसा करता आहात. म्हणून या दोघांमध्ये जो एक माझ्यासाठी मंगलजनक असेल, त्यास सुनिश्चितपणे सांगा॥१॥

**श्रीभगवानुवाच—**

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते॥२॥**

श्रीभगवान म्हणाले–कर्मसंन्यास आणि कर्मयोग दोन्ही ही कल्याणकारी आहेत, परंतु या दोघांतही निष्काम कर्मयोगच कर्मसंन्यासापेक्षा श्रेष्ठ आहे॥२॥

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति।**
**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते॥३॥**

हे महाबाहो! जी व्यक्ती न कोणाचा द्वेष करते आणि न कोण्या वस्तूची आकांक्षा करते, ती सर्वदाच संन्यासी म्हणून समजले जाण्यायोग्य आहे, कारण राग–द्वेष इत्यादी द्वंद्वांनी रहित व्यक्तीच या संसार–बंधनातून अनायास मुक्त होऊ शकते॥३॥

**साङ्ख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम्॥४॥**

अज्ञ व्यक्तिगणच सांख्य आणि कर्मयोगास वेगवेगळे समजतात, पंडितगण नव्हे. एकेकाचा चांगल्या प्रकारे आश्रय केल्याने दोघांच्या मोक्षरूप फळाची प्राप्ती होते॥ ४॥

**यत्साङ्ख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते।**
**एकं साङ्ख्यञ्च योगं च यः पश्यति स पश्यति॥५॥**

सांख्ययोगाद्वारे जे स्थान प्राप्त होते, कर्मयोगाद्वारे सुद्धा तेच स्थान प्राप्त होते. जे

सांख्ययोग आणि निष्काम कर्मयोगास समान फलदायी पाहतात, तेच तत्त्वदर्शी आहेत॥५॥

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति॥६॥**

हे महाबाहो! निष्काम कर्मयोगरहित संन्यास दुःखदायी आहे, परंतु निष्काम कर्म करणारे ज्ञानी होऊन शीघ्रच ब्रह्मास प्राप्त होतात॥६॥

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रियः।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते॥७॥**

जो निष्काम कर्मयोगी आहे, तो विशुद्ध अंतःकरणाचा, विजितात्मा आणि जितेंद्रिय आहे आणि सर्व जीवांचा अनुरागभाजन आहे, तो कर्म करून सुद्धा कर्मात लिप्त होत नाहीत॥७॥

**नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्।**
**पश्यन् शृण्वन् स्पृशन् जिघ्रन्नश्नन् गच्छन् स्वपन् श्वसन्॥८॥**
**प्रलपन् विसृजन् गृह्णन्नुन्मिषन् निमिषन्नपि।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्त्तन्त इति धारयन्॥९॥**

कर्मयोगी तत्त्वज्ञ असूनही दर्शन, श्रवण, स्पर्श, घ्राण, भोजन, गमन, निद्रा, श्वास, कथन त्याग, ग्रहण, उन्मीलन, निमीलन इत्यादी केल्यावर पण बुद्धीच्या द्वारे निश्चय करून असे मानतात की इंद्रिय आपापल्या विषयांत तल्लीन आहेत, मी तर काहीच करीत नाही॥८-९॥

**ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा॥१०॥**

जी व्यक्ती कर्माची आसक्ती त्यागून सर्व कर्मांना माझ्याप्रती अर्थात परमेश्वराप्रती समर्पित करून करते, ती पाण्याने कमळाच्या पानाप्रमाणे पापाने लिप्त होत नाही॥१०॥

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये॥११॥**

योगिगण चित्तशुद्धीसाठी आसक्ती त्याग करून काया, मन आणि बुद्धीद्वारे अथवा कधी मनःसंयोगरहित केवळ इद्रियांद्वारे सुद्धा कर्म करतात॥११॥

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम्।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते॥१२॥**

निष्काम कर्मयोगी कर्मफळाची आसक्ती त्याग करून निष्ठाप्राप्त मोक्षाला प्राप्त करतात. परंतु, सकाम कर्मी कामप्रवृत्तिवश फलासक्त होवून बंधनाला प्राप्त होतात (बांधले जातात)॥१२॥

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन्॥५-१३॥**

जितेंद्रिय जीव मनाद्वारे कर्मांचा त्याग करून स्वतः कर्म करत नाही आणि दुसऱ्यांकडून ही करवित नाही. अशाप्रकारे तो या नऊ दरवाज्यांच्या शरीरात सुखपूर्वक अवस्थित राहतो॥१३॥

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते॥१४॥**

ईश्वराने लोकांच्या कर्तृत्व, कर्म आणि कर्मफलाच्या संयोगाचे सृजन केलेले नाही. उलट त्यांचा स्वभाव अर्थात अनादी अविद्याच यात प्रवृत्त होते आहे॥१४॥

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः॥१५॥**

परमेश्वर कोणाच्या पापाला आणि पुण्याला ग्रहण करीत नाहीत. अविद्याद्वारे जिवाचे स्वाभाविक ज्ञान आच्छादित आहे. त्याद्वारेच समस्त जीव मोहित होत आहेत॥१५॥

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम्॥१६॥**

परंतु, ज्यांचे हे अज्ञान भगवंताच्या ज्ञानाने विनष्ट झाले आहे, त्यांचे ते ज्ञानच सूर्याच्या समान प्रकाशित होऊन (अंधकार किंवा अविद्येला नष्ट करीत) अप्राकृत तत्त्वाला प्रकाशित करते॥१६॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः।**
**गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः॥१७॥**

ज्यांची बुद्धी परमेश्वरात निविष्ट आहे, ज्यांचे मन केवळ त्यांच्याच ध्यानात मग्न आहे, ज्यांची समस्त अविद्या विद्येद्वारे नष्ट होऊन चुकली आहे, ते अपुनरावृत्तिरूप मोक्षाला प्राप्त होतात॥१७॥

**विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।**
**शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः॥१८॥**

ज्ञानिगण विद्या-विनयाने संपन्न ब्राह्मण, चांडाळ, गाय, हत्ती आणि कुत्र्यात सुद्धा समदर्शी असतात॥१८॥

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः॥१९॥**

ज्या लोकांचे मन समत्वात अवस्थित आहे, त्यांच्या द्वारे या लोकातच संपूर्ण विश्वच जिंकल्या गेले आहे. कारण, ब्रह्म निर्दोष आणि समभावयुक्त आहे, म्हणून ते ब्रह्मातच अवस्थित राहते॥१९॥

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम्।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः॥२०॥**

ब्रह्मात अवस्थित ब्रह्मवेत्ता पुरुष स्थिर बुद्धीचा आणि मोहरहित असतो. तो प्रिय वस्तूला प्राप्त करून हर्षित होत नाही आणि अप्रिय वस्तूला प्राप्त करून उद्विग्न पण होत नाही॥२०॥

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम्।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षयमश्नुते॥२१॥**

विषयसुखात अनासक्त चित्त असणारे लोक आत्म्यात जे सुख आहे, त्यास प्राप्त करतात. ब्रह्मयोगाने युक्त ते पुरुष अक्षय सुख प्राप्त करतात॥२१॥

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते।**
**आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः॥५-२२॥**

हे कौन्तेय! जे समस्त भोग विषयाच्या संयोगाने उत्पन्न होतात, ते सर्व निश्चयच दुःखाचे कारण आहेत आणि आदि आणि अंत होणारे आहेत. ज्ञानी पुरुष त्यात अनुरक्त होत नाहीत॥२२॥

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात्।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः॥२३॥**

जो पुरुष या जन्मातच शरीराचा नाश होण्याच्या पूर्वी काम आणि क्रोधापासून उत्पन्न वेगास सहन करण्यास समर्थ असतो, तोच योगी आहे आणि तोच सुखी आहे॥२३॥

**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति॥२४॥**

जो आत्म्यात सुखी आहे, आत्म्यातच रमण करणारा आहे आणि आत्म्यातच दृष्टियुक्त आहे, तो योगी पुरुष ब्रह्मात अवस्थित होऊन ब्रह्मानंदास प्राप्त होतो॥ २४॥

**लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः॥२५॥**

निष्पाप, निःसंशय, संयतचित्त आणि सर्व प्राण्यांच्या हितात रत ऋषिगण ब्रह्मनिर्वाण प्राप्त करतात॥२५॥

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम्।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम्॥२६॥**

काम, क्रोध इत्यादीने रहित संयत चित्त असणारे आत्मतत्त्वज्ञ यतिगणांसाठी सर्वतोभावेन ब्रह्मनिर्वाण उपस्थित होते॥२६॥

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ॥२७॥**
**यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः॥२८॥**

जो शब्द-स्पर्श इत्यादी बाह्य विषयांना मनातून बहिष्कृत करून, दृष्टीला दोन्ही भृकुटींच्या मध्ये स्थित करून उच्छ्वास आणि निःश्वास रूपाने दोन्ही नासिकांमध्ये विचरणशील प्राण आणि अपान वायूच्या उर्ध्व आणि अधोगतीस रोखून, त्यांना समान करून अर्थात कुंभक करून जितेंद्रिय, जितमना, जितबुद्धी, मोक्षपरायण आणि इच्छा, भय, क्रोधरहित आहेत, ते सर्वदाच मुक्त आहेत॥२७-२८॥

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम्।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति॥२९॥**

मनुष्य मला सर्व यज्ञ आणि तपस्यांचा भोक्ता, सर्व लोकांचा महानियन्ता आणि सर्व जीवांचा सुहृद जाणून मोक्ष प्राप्त करतो॥२९॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि**
**श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**
**ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'संन्यासयोगो' नाम**
**पञ्चमोऽध्यायः।**

**॥पाचवा अध्याय समाप्त॥**

# अध्याय ६
## षष्ठोऽध्यायः

**श्रीभगवानुवाच–**

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः॥१॥**

श्री भगवान म्हणाले–जे कर्मफळाची अपेक्षा न करता अवश्य करणीय कर्मांना करतात, ते संन्यासी आणि योगी आहेत. अग्निहोत्र इत्यादी कर्मांना त्याग करणारा संन्यासी नाही आहे आणि दैहिक कर्ममात्राला परित्याग करणारा योगी नाही आहे॥१॥

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव।**
**न ह्यसंन्यस्तसङ्कल्पो योगी भवति कश्चन॥२॥**

हे अर्जुन! पंडितगण ज्यास संन्यास म्हणतात, तुम्ही त्यासच योग जाणा, कारण जो कामसंकल्प (फळाची इच्छा आणि विषय–भोगाची इच्छा परित्याग करण्यास असमर्थ आहे, तो योगी नाही आहे॥२॥

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते॥३॥**

निश्चल ध्यानयोगात आरूढ होण्यास इच्छुक मुनीसाठी कर्मच साधन म्हणविले जाते आणि योगारूढ अवस्थेमध्ये अर्थात ध्याननिष्ठ झाल्यावर विक्षेप कर्मांचा त्यागच त्या मुनीसाठी साधन म्हणविला जातो॥३॥

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते।**
**सर्वसङ्कल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते॥४॥**

ज्या वेळी त्यांना न तर इन्द्रियग्राह्य विषयांत आणि न कर्मांत आसक्ती राहते, त्या वेळी समस्त फलाकांक्षांचा त्याग करणारा त्यागी ते पुरुष योगपथावर आरूढ (योगारूढ) म्हणविले जातात॥४॥

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।**
**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः॥५॥**

मनुष्याने अनासक्त मनाद्वारे आत्म्याचा संसारातून उद्धार करावा, आपल्या आत्म्याची अधोगती होऊ देऊ नये. कारण, आत्मा अर्थात मनच आपला बंधू आणि मनच आपला शत्रू आहे॥५॥

**बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत्॥६॥**

ज्या जीवात्म्याद्वारे मन जिंकल्या गेले आहे, त्या जीवात्म्याचे मनच त्याचे बंधू आहे, परंतु अजितेंद्रिय जीवाचे मनच शत्रू प्रमाणे अपकारात प्रवृत्त होते॥६॥

**जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः॥७॥**

शीत–उष्ण, सुख–दुःख आणि मान–अपमानात राग–द्वेषादीने रहित जितमना योगीचा आत्मा अतिशय समाधिस्त होतो॥७॥

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः॥८॥**

ज्यांचे चित्त ज्ञान आणि विज्ञानाने तृप्त आहे, जो विकाररहित आणि जितेंद्रिय आहे आणि माती, दगड आणि सोन्यात समदर्शी आहे, ते योगारूढ पुरुष योगी म्हणवितात॥८॥

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते॥९॥**

सुहृद, मित्र, शत्रू, उदासीन, मध्यस्थ, द्वेष्य, बंधू, साधू आणि पापींच्या प्रती देखील समभावयुक्त पुरुष विशिष्ट अर्थात अतिश्रेष्ठ असतात॥९॥

**योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः॥१०॥**

योगी पुरुष निर्जन स्थानी एकाकी निवास करीत चित्त आणि देहाला संयत करून आशारहित होऊन आणि विषयाला अस्वीकार करून मनाला सर्वदा समाधियुक्त करतील॥१०॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम्॥११॥**

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः।
उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये॥१२॥

पवित्र स्थानात न अती उच्च आणि न अति निम्न कुशासनावर मृग–चर्मासन आणि त्यावर वस्त्रासन अंथरून, त्या निश्चल आसनाला भूमीवर स्थापित करीत त्या आसनावर बसून, मनाला एकाग्र करून, चित्त, इंद्रिय आणि त्यांच्या कार्यांचे संयमन करीत अंतःकरणाच्या शुद्धीकरिता योगाभ्यास करतील॥११–१२॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्॥१३॥**
**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः॥१४॥**

ब्रह्मचर्य व्रतात स्थित, निर्भय तथा प्रशांत आत्मा शरीर, मान आणि मस्तकाला लम्बवत ठेवीत, अन्य दिशांना दृष्टिपात न करीत दृष्टीला आपल्या नाकाच्या अग्रभागावर केंद्रित करून, मनाला संयमित करून, चित्ताला माझ्यात लावीत आणि माझ्या परायण होऊन युक्त भावाने राहतील. ॥१३-१४॥

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः।**
**शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति॥१५॥**

संयतचित्त योगी पूर्वोक्त रितीने मनाला सदाच योगयुक्त करून माझ्या स्वरूपात अवस्थित होऊन परम निर्वाणरूपी शांती प्राप्त करतात॥ १५॥

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन॥१६॥**

हे अर्जुन! न तर अत्याहारीचा आणि न तर अनाहारीचा आणि न अतिशय निद्रापरायण आणि न तर सदा जागृत रहाणाऱ्याचा योग सिद्ध होतो॥१६॥

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा॥१७॥**

यथायोग्य आहार-विहार करणाऱ्या, कर्मांत यथायोग्य प्रयत्न करणाऱ्या आणि यथायोग्य झोपणाऱ्या आणि जागणाऱ्यांचा योग सांसारिक क्लेशांना हरण करणारा असतो॥१७॥

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते।**
**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा॥१८॥**

जेव्हा मन संपूर्णरूपाने संयमित होऊन निश्चल भावाने आत्म्यातच अवस्थित होतो, तेव्हा समस्त कामनांच्या स्पृहेने रहित व्यक्ती युक्त म्हटली जाते॥१८॥

**यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता।**
**योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः॥१९॥**

ज्या प्रकारे दीप वायुरहित स्थानात कंपित होत नाही, त्याचप्रकारे आत्मविषयक योगाभ्यासकारी संयतचित्त योगीची उपमा जाणायला हवी॥१९॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति॥२०॥**
**सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम्।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः॥२१॥**
**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।**
**यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते॥२२॥**
**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम्।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा॥२३॥**
**सङ्कल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः।**
**मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः॥२४॥**
**शनैः शनैरुपरमेद् बुद्ध्या धृतिगृहीतया।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किञ्चिदपि चिन्तयेत्॥२५॥**

ज्या अवस्थेत योग्याचे चित्त योगाभ्यास द्वारा संयमित होऊन विषयांतून विरक्त होऊन जाते, ज्या अवस्थेत विशुद्ध चित्ताद्वारे आत्म्याचे दर्शन करीत-करीत तो आत्म्यातच तुष्ट होतो, ज्या अवस्थेत तो योगी केवळ बुद्धीद्वारे ग्रहणीय इंद्रितातीत नित्य सुखांचा अनुभव करतो, ज्या अवस्थेत स्थित होऊन आत्मस्वरूपातून भ्रष्ट होत नाही, ज्या लाभास (आत्मसुखास) प्राप्त करून अन्य लाभांना त्यापेक्षा अधिक मानत नाही आणि ज्या अवस्थेत अवस्थित होऊन गुरुतर (भयानक) दुःखांनीदेखील अभिभूत होत नाही, त्या अवस्थेस सुख-दुःखाच्या संपर्काच्या रहित योगाच्या नामाने जाणा. योगी व्यक्तीने त्या योगाचा अभ्यास धैर्ययुक्त चित्ताद्वारे, संकल्पाने उत्पन्न होणाऱ्या समस्त कामनांचा संपूर्ण परित्याग करून, मनाच्या द्वारे सर्व दिशांपासून इंद्रियांना संयत करून, साधुशास्त्राच्या उपदेशानुसार निश्चयपूर्वक करायला हवा. धैर्ययुक्त बुद्धीद्वारे मनाला आत्म्यात स्थित करून योगी क्रमशः विरक्त होईल आणि काहीच चिंता करणार नाही॥२०-२५॥

**यतो यतो निश्चलति मनश्चञ्चलमस्थिरम्।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत्॥२६॥**

हे चंचल आणि अस्थिर मन ज्या ज्या विषयांकडे धावित होते, मनाला त्या त्या विषयांनी निगृहीत करून आत्म्यातच स्थित करतील॥२६॥

**प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम्।**

**उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम्॥२७॥**

रजोजुण आणि राग-द्वेषादीने रहित अश्या प्रशांतचित्त ब्रह्मभावसंपन्न योगीस आत्मानुभावरूप उत्तम सुख प्राप्त होते॥२७॥

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते॥२८॥**

अशा प्रकारे पापरहित योगी मनाला निरंतर योगनिष्ठ करीत-करीत अनायासेच ब्रह्मप्राप्तिरूप परम सुख प्राप्त करतात अर्थात जीवनातून मुक्त होऊन जातात॥२८॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः॥२९॥**

सर्व समदर्शी योगयुक्त पुरुष सर्व भूतांत आत्म्याला आणि आत्म्यांत सर्व भूतांना अवस्थित पाहतात॥२९॥

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति॥३०॥**

जो सर्व भूतांत (जीवांत) मला आणि माझ्यात सर्व भूतांना (जीवांत) पाहतात, त्यांच्या साठी मी अदृश्य नाही आहे आणि ते सुद्धा माझ्यासाठी अदृष्य नाही आहेत. ॥३०॥

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते॥६-३१॥**

जो योगी एकत्व बुद्धीने अर्थात माझ्या प्रती साधन आणि सिद्धकालगत द्वैतबुद्धीने रहित होऊन, माझा आश्रय करून सर्व भूतांत (जीवांत) स्थित माझे भजन करतात, तो योगी सर्व अवस्थांत राहून माझ्यातच अवस्थित राहतात॥३१॥

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः॥६-३२॥**

हे अर्जुन! जो योगी आपल्या समानच सर्व जीवांना सुख-दुःखात समान पाहतो, तो माझ्या मतानुसार श्रेष्ठ आहे॥३२॥

**अर्जुन उवाच—**

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन।**
**एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम्॥३३॥**

अर्जुन म्हणाले—हे मधुसूदन! आपल्याद्वारे सर्वत्र समदर्शनरूप जो योग कथित झाला आहे, मनाच्या चंचलतेमुळे मी त्याच्या स्थायित्वाला पाहू शकत नाही

आहे ॥३३॥

**चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम्।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्॥३४॥**

हे कृष्ण! कारण मन स्वभावतः चंचल आहे; बुद्धी, शरीर आणि इंद्रियांचे मंथन करणारे आहे, बलवान आणि दृढ आहे, म्हणून मनाला वशात करणे मी वायूला वशात करण्याच्या समान अत्यंत दुष्कर मानतो॥३४॥

**श्रीभगवानुवाच–**

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम्।**
**अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते॥३५॥**

श्रीभगवान म्हणाले – हे महाबाहो अर्जुन! निःसंशय मन चंचल आणि कठीणतेने वश होणारे आहे, परंतु हे कुन्तीपुत्र! अभ्यास आणि वैराग्याद्वारे हे वशात होऊन जाते॥३५॥

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः॥३६॥**

अवशीभूत मनाच्या व्यक्तीसाठी योग दुष्प्राप्य आहे, परंतु यत्नवान आणि वशीभूत मनाच्या व्यक्तींकरिता हा उपायाद्वारे प्राप्त केल्या जाऊ शकतो॥३६॥

**अर्जुन उवाच–**

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति॥३७॥**

अर्जुन म्हणाले–हे कृष्ण! श्रद्धापूर्वक योगात प्रवृत्त, परंतु असंयमित चित्ताचा पुरुष योगातून भ्रष्ट झाल्यावर, योग–सिद्धीला न प्राप्त करून कोणती गती प्राप्त करतो॥३७॥

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि॥३८॥**

हे महाबाहो! ब्रह्मप्राप्तीच्या मार्गात विक्षिप्त आणि आश्रयहीन तथा कर्ममार्ग आणि योगमार्ग–दोन्हींतून पतित पुरुष खंडित मेघाच्या (ढगाच्या) समान छिन्न–भिन्न होऊन काय नष्ट होऊन जात नाही?॥३८॥

**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः।**
**त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते॥३९॥**

हे कृष्ण! आपणच माझ्या या संशयाचे संपूर्ण रूपाने छेदन करण्यास समर्थ आहात, आपल्या अतिरिक्त कोणीही संशय छेदन करणारा मिळणे असंभव आहे॥

३९ ॥

**श्रीभगवानुवाच–**

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते।**
**न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति॥४०॥**

श्री भगवान म्हणाले–हे पार्थ! त्या पुरुषाचा न तर या लोकात नाश होतो, न परलोकात, कारण हे तात! शुभ अनुष्ठानकारी कोणी व्यक्ती दुर्गतीस प्राप्त होत नाही॥४०॥

**प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते॥४१॥**

अल्पकाळाच्या अभ्यासानंतर योगभ्रष्ट पुरुष पुण्यवान व्यक्तींसाठी प्राप्त होणाऱ्या लोकांना प्राप्त करून तेथे अनेक वर्षापर्यंत निवास केल्यानंतर सदाचार–संपन्न धनवानांच्या गृहात जन्म ग्रहण करतो॥४१॥

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम्॥४२॥**

अथवा, बहुकाळ अभ्यासानंतर योगभ्रष्ट योगी ज्ञानवंत योगींच्या गृहात जन्म ग्रहण करतो. निःसंदेह अशा प्रकारचा जन्म या लोकात अत्यंत दुर्लभ आहे॥४२॥

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन॥४३॥**

हे कुरुनंदन! तो योगभ्रष्ट पुरुष तेथे पूर्वजन्मजात परमात्म–विषयिणी बुद्धीस प्राप्त करतो आणि त्यानंतर पुन्हा योगाच्या संसिद्धीसाठी प्रयत्न करतो॥४३॥

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते॥४४॥**

निश्चयच पूर्व अभ्यासामुळे कोण्या विघ्नाच्या उपस्थित झाल्यावर सुद्धा तो मोक्षपथाकडे आकृष्ट होऊन जातो आणि योगाच्या विषयी थोडीशी जिज्ञासा केल्यावरच वेदोक्त कर्ममार्गाचे उल्लंघन करतो॥४४॥

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्॥४५॥**

परंतु, प्रयत्नपूर्वक अभ्यास करणारा योगी निष्पाप होऊन अनेक जन्मांनंतर सिद्ध झाल्यावर परम गती लाभ करतो॥४५॥

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन॥४६॥**

योगीला (परमात्म्याच्या उपासकाला) तपस्वी, ज्ञानी (ब्रह्माचे उपासक) आणि कर्मीपेक्षा श्रेष्ठ मानले गेले आहे. म्हणून हे अर्जुन! तुम्ही योगी बना॥४६॥

**योगिनामपि सर्वेषां मद्‌गतेनान्तरात्मना।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः॥४७॥**

माझ्या मतानुसार समस्त योग्यांमध्ये तो योगी सर्वश्रेष्ठ आहे जो श्रद्धावान होऊन माझ्यात आसक्त मनाद्वारे निरंतर माझे भजन करतो॥४७॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि**
**श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**
**ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'ध्यानयोगो' नाम षष्ठोऽध्यायः।**
**॥सहावा अध्याय समाप्त॥**

# अध्याय ७

## सप्तमोऽध्यायः

**श्रीभगवानुवाच–**

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु॥१॥**

श्रीभगवान म्हणाले–हे पार्थ! माझ्यात आसक्तचित्त आणि माझ्यात परायण होऊन योगानुष्ठान करता–करता निःसंदेह ज्या प्रकारे मला संपुर्णरूपात जाणशील, त्याचे श्रवण कर॥१॥

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज् ज्ञातव्यमवशिष्यते॥२॥**

मी तुमच्यासाठी विज्ञानासहित या ज्ञानाला संपूर्णरूपात सांगीन, ज्याला जाणून या जगात पुन्हा आणखी जाणण्यायोग्य काहीच उरत नाही॥ २॥

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः॥३॥**

हजारो लोकांमध्ये कोणी एक सिद्धीसाठी यत्न करतो आणि यत्नपरायण सिद्धांमध्ये कोणी एक मला स्वरूपतः जाणतो॥३॥

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा॥४॥**

माझी बहिरंगा प्रकृती भूमी, जल, अग्नी, पवन, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार–या आठ भागांत विभक्त आहे॥४॥

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥५॥**

परंतु, आठ भेदांची ही जड प्रकृती निकृष्ट आहे. यापेक्षा उत्कृष्ट जीवस्वरूपा माझी आणखी एक प्रकृती जाणा, ज्याद्वारे हे जगत आपल्या कर्माद्वारे भोगण्यास गृहीत होते आहे॥५॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥६॥**

समस्त भूतांना पूर्वोक्त माझ्या दोन प्रकृतींपासून उत्पन्न जाणा. मी समस्त जगताचा स्रष्टा आणि संहारकर्ता आहे॥६॥

**मत्तः परतरं नान्यत् किञ्चिदस्ति धनञ्जय।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव॥७॥**

हे धनंजय! अन्य कुणीही माझ्यापेक्षा श्रेष्ठ नाही, धाग्यात मण्यांप्रमाणे हे संपूर्ण जगत माझ्यात ओवलेले आहे॥७॥

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु॥८॥**

हे कौन्तेय! मी जलात रस आहे आणि चंद्रात ज्योती आहे, सर्व वेदांत ओंकार आहे, आकाशात शब्द आहे आणि पुरुषांत पुरुषत्व देखील मीच आहे॥८॥

**पुण्यो गन्धः पृथिव्याञ्च तेजश्चास्मि विभावसौ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु॥९॥**

मी पृथ्वीचा पवित्र गंध आहे, अग्नीचे तेज आहे, सर्व भूतांची आयू आहे आणि तपस्वींचा तप आहे॥९॥

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम्।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्॥१०॥**

हे पार्थ! मला सर्व भूतांचे नित्य कारण जाणा. मी बुद्धिमंताची बुद्धी आणि तेजस्वींचे तेज आहे॥१०॥

**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम्।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ॥११॥**

हे भरतकुलश्रेष्ठ! मी बलवंताचे आसक्तिरहित आणि आकांक्षारहित बल आणि सर्व जीवांत केवळ संतान उत्पत्तीसाठी उपयोगी धर्मसंगत काम आहे॥११॥

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि॥१२॥**

जे सात्त्विक भावसमूह आहेत आणि जे राजसिक आणि तामसिक भावसमूह आहेत, ते समस्त माझ्या प्रकृतीचे गुणकार्य आहेत. मी त्या समस्त गुणांत स्वाधीन आहे, परंतु ते समस्त माझ्या शक्तीच्या अधीन आहेत.॥१२॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत्।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम्॥१३॥**

पूर्वोक्त त्रिविध गुणमय भावांद्वारे संपूर्ण जगत मोहित आहे, म्हणून

लोक त्रिगुणातीत तथा अविनाशी मला जाणू शकत नाहीत॥१३॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥१४॥**

ही जीव-विमोहिनी आणि त्रिगुणात्मिका माझी बहिरंगा शक्ती निश्चयच दुस्तर आहे, परंतु जे माझा आश्रय ग्रहण करतात, ते या मायेला पार करून जातात॥१४॥

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः॥१५॥**

दूषित कर्म करणारे अथवा दुर्भाग्यशील, विवेकशून्य, मनुष्यांत नीच, मायेद्वारे विलुप्त ज्ञान असणारे आणि आसुर भावयुक्त व्यक्तिगण माझा आश्रय ग्रहण करित नाहीत॥१५॥

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ॥१६॥**

हे भरतर्षभ (हे भरतवंशीमध्ये श्रेष्ठ)! (१)आर्त (रोग, शत्रू, भय इत्यादीने अभिभूत), (२)जिज्ञासू (आत्मज्ञानार्थी किंवा व्याकरण इत्यादी शास्त्रज्ञानाचे इच्छुक), (३) अर्थार्थी (पृथ्वी, हत्ती, अश्व, कामिनी इत्यादी ऐहिक आणि पारलौकिक भोगाची इच्छा ठेवणारे) सकाम गृहस्थ आणि (४)ज्ञानी (विशुद्ध अंतःकरण असणारे निष्काम संन्यासी)-हे चार प्रकारचे सुकृतिशील लोक माझे भजन करतात॥१६॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः॥१७॥**

त्यांच्यात नित्य माझ्यात एकाग्रचित्त आणि एकमात्र माझ्यात अनुरक्त तत्त्वविद् ज्ञानी व्यक्ती श्रेष्ठ आहेत, कारण मी त्यांना अतिशय प्रिय आहे आणि ते सुद्धा मला प्रिय आहेत॥१७॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम्॥१८॥**

हे सर्व महत् आहेत, कारण ज्ञानी व्यक्ती माझे आत्मस्वरूप आहेत-हेच माझे अभिमत आहे, कारण ते मद्‌गतचित्त होऊन सर्वोत्तम गतिस्वरूप माझाच आश्रय करून अवस्थान करतात॥१८॥

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते।**

**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥१९॥**

समस्त वस्तू वासुदेवमय आहेत–अशाप्रकारे ज्ञानसंपन्न पुरुष अनेक जन्मांनंतर माझा आश्रय ग्रहण करतात. असे महात्मा नितांत दुर्लभ आहेत॥१९॥

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया॥२०॥**

आर्ती इत्यादी दूर करण्याच्या कामनांद्वारा ज्यांचे ज्ञान हरण झाले आहे, ते त्या त्या देवतांच्या आराधनेच्या उपयुक्त नियमांचे अवलंबन करून आपल्या स्वभावाच्या वशीभूत होऊन देवतांचे भजन करतात॥२०॥

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्॥२१॥**

जो जो सकाम भक्त ज्या ज्या देवमूर्तीची श्रद्धापूर्वक पूजा करू इच्छितो, मी अंतर्यामी रूपात त्या त्या भक्ताची श्रद्धा त्या त्या देवतेतच दृढ करून टाकतो॥ २१॥

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते।**
**लभते च ततः कामान् मयैव विहितान् हि तान्॥२२॥**

ती व्यक्ती त्या श्रद्धेने युक्त होऊन त्या देवतेच्या पूजेचा प्रयास करते आणि त्या कामनांना त्या देवतेकडून प्राप्त करते, जे की माझ्याद्वारेच विधान केले गेले आहेत॥२२॥

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम्।**
**देवान् देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि॥२३॥**

परंतु, त्या अल्पबुद्धी असणाऱ्यांचे फळ नश्वर आहे. देवपूजकगण देवतांना प्राप्त करतात आणि माझे भक्तगण मलाच प्राप्त करतात॥ २३॥

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम्॥७–२४॥**

बुद्धिहीन व्यक्तिगण माझे सर्वोत्तम, सर्वश्रेष्ठ, अव्यय, अप्राकृत, स्वरूप–जन्म–लीला इत्यादींना न जाणून, प्रपंचातीत माझ्या मायिक मनुष्य इत्यादीप्रमाणे जन्म ग्रहण करणारे मानतात॥२४॥

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्॥२५॥**

योगमायेद्वारे आवृत मी सर्वांच्या दृष्टिगोचर होत नाही. अज्ञानी

मानवगण जन्मरहित आणि नित्य मला जाणत नाहीत॥२५॥

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन॥२६॥**

हे अर्जुन! मी भूत, वर्तमान आणि भविष्याच्या स्थावर जंगम इत्यादी समस्त भूतांना (जीवांना) जाणतो, परंतु मला कोणी जाणत नाही॥ २६॥

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत।**
**सर्वभूतानि सम्मोहं सर्गे यान्ति परन्तप॥२७॥**

हे परंतप! हे अर्जुन! सृष्टीच्या आरंभी समस्त जीव इच्छा आणि द्वेषाने उत्पन्न सुख-दुःख आदी द्वन्द्व विषयांनी सम्यकरूपाने मोहित होतात॥२७॥

**येषांत्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम्।**
**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः॥७-२८॥**

परंतु ज्या पुण्यकर्मकारी लोकांचे पाप नष्ट झाले आहे, ते सुख-दुःख इत्यादी मोहातून मुक्त होऊन अविचलित चित्ताने माझे भजन करतात॥२८॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम्॥२९॥**

जे जरा-मरणाने मुक्त होऊन माझा आश्रय करून साधन करतात, ते त्या ब्रह्मास, शुद्ध जीवात्मस्वरूपास आणि संसार-बंधनरूप समस्त कर्मांस जाणतात॥२९॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः॥३०॥**

जी समस्त व्यक्ती मला अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञासोबत जाणतात, माझ्यात आसक्तचित्त ती व्यक्ती अंतकाळीसुद्धा मला जाणते अर्थात मृत्युकाळातसुद्धा मला स्मरण करू शकतात॥३०॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**

ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'ज्ञानविज्ञानयोगो' नाम सप्तमोऽध्यायः॥

# अध्याय ८

## अष्टमोऽध्यायः

**अर्जुन उवाच–**

**किं तद् ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम।**
**अधिभूतञ्च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते॥१॥**

अर्जुन म्हणाले–हे पुरुषोत्तम! ब्रह्म काय आहे, अध्यात्म काय आहे, कर्म काय आहे आणि अधिभूत आणि अधिदैव कशाला म्हणतात?॥१॥

**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन् मधुसूदन।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः॥२॥**

हे मधुसूदन! या देहात यज्ञाचे अधिष्ठाता कोण आहेत, ते कशा प्रकारे अवस्थित आहेत आणि ते मृत्यूच्या वेळी संयतचित्ताच्या पुरुषांना कशा प्रकारे ज्ञात होतात?॥२॥

**श्रीभगवानुवाच।**

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः॥३॥**

श्री भगवान म्हणाले–नित्य अक्षर अर्थात विनाशरहित परम तत्त्वच ब्रह्म आहे, शुद्ध जीव अध्यात्म म्हटल्या जातो आणि जीवांची उत्पत्ती आणि वृद्धी करणारा संसारच ‘कर्म’ संज्ञेने अभिहित होतो॥३॥

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर॥४॥**

हे देहधारींत (शरीर धारण करणाऱ्यांमध्ये) श्रेष्ठ अर्जुन! सर्व नश्वर पदार्थ अधिभूत आहेत, विराट पुरुष अधिदैव अर्थात देवतांचे अधिपती आहेत आणि मीच या शरीरात अधियज्ञ अर्थात अंतर्यामीरूपात यज्ञादी कर्मांचा प्रवर्तक आहे॥४॥

**अन्तकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम्।**

**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः॥५॥**

जो अंतिम काळात देखील माझेच स्मरण करत आपल्या शरीराचा त्याग करून प्रस्थान करतात, ते माझ्या भावाला प्राप्त होतात, यात कोणतीही शंका नाही॥५॥

**यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यन्ते कलेवरम्।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः॥६॥**

हे कौन्तेय (हे कुन्तीपुत्र)! जे अंतकाळी ज्या ज्या विषयाची चिंता करीत शरीराचा त्याग करतात, सर्वदा त्याच चिंतनात तन्मय ते त्याच त्याच भावाला प्राप्त होतात॥६॥

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः॥७॥**

म्हणून निरंतर माझे स्मरण करा आणि युद्ध करा. मन आणि बुद्धी माझ्यात समर्पित केल्याने निःसंशय मलाच प्राप्त होशील॥७॥

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन्॥८॥**

हे पार्थ! अभ्यासयोगाने युक्त आणि कधी इतरत्र न जाणाऱ्या चित्ताने निरंतर परम पुरुषाचे चिंतन करीत-करीत त्यांनाच प्राप्त होतो॥८॥

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयंसमनुस्मरद् यः।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात्॥९॥**
**प्रयाणकाले मनसाऽचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम्॥१०॥**

जो एकाग्रचित्त होऊन आणि भक्तिसहित योगबलाने दोन भुवयांच्या मध्ये प्राणवायूला उत्तम रितीने स्थापित करून सर्वज्ञ, अचिन्त्य रूप, सूर्याच्या सदृश स्वप्रकाशित आणि प्रकृतीच्या अतीत पुरुषाचे मृत्युकाळात स्मरण करतात, ते त्याच दिव्य परम पुरुषास प्राप्त करतात॥९-१०॥

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये॥११॥**

वेदज्ञ पण्डितगण ज्यास अविनाशी म्हणतात, वासनारहित संन्यासीगण ज्यात प्रविष्ट होतात आणि ज्यास प्राप्त करण्याचा अभिलाषेने

ब्रह्मचारिगण ब्रह्मचर्याचे पालन करतात, त्या प्राप्य वस्तूच्या विषयात तुम्हाला सांगतो आहे॥११॥

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम्॥१२॥**
**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्।**
**यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम्॥१३॥**

जी व्यक्ती सर्व इन्द्रियरूप द्वारांना विषयांपासून संयमित करून, मनाला हृदयात निरोध करून, भ्रूद्वयाच्या मध्यात प्राणवायूला स्थापित करून आत्मविषयक समाधिरूप योगस्थैर्यासहित 'ॐ'—या एकाक्षर ब्रह्मवाचक शब्दाचे उच्चारण करीत-करीत आणि माझे ध्यान करीत-करीत देहत्यागपूर्वक प्रयाण करतात, ते परम गतीस प्राप्त होतात॥१२-१३॥

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः॥१४॥**

हे पार्थ! जो अन्य भावनाशून्य होऊन निरंतर, प्रतिदिन माझे स्मरण करतो, त्या नित्ययुक्त योगीकरिता मी सुलभ आहे॥१४॥

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम्।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः॥१५॥**

महात्मागण मला प्राप्त करून पुन्हा दुःखाचा आश्रयस्वरूप अनित्य जन्म ग्रहण करीत नाहीत, कारण ते परम सिद्धीला प्राप्त झाले आहेत॥१५॥

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्त्तिनोऽर्जुन।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते॥१६॥**

हे अर्जुन! ब्रह्मलोकपर्यंत समस्त लोक पुनरावर्त्तनशील आहेत, परंतु मला प्राप्त होऊन पुनर्जन्म होत नाही॥१६॥

भावानुवाद—सगळे जीव, इतकेच काय तर महासुकृतिवान सुद्धा जन्म ग्रहण करतात, परंतु माझे भक्तगण त्यांच्याप्रमाणे ग्रहण करत नाहीत, ब्रह्मदेवाच्या सत्यलोकापर्यंत व्याप्त समस्त जीव जन्म ग्रहण करतात॥ १६॥

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदुः।**
**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः॥१७॥**

जी व्यक्ती हे जाणते की एक हजार चतुर्युगपर्यंत ब्रह्मदेवाचा दिवस आणि एक हजार चतुर्युगपर्यंत ब्रह्मदेवाची रात्र असते, ती रात्र-दिवसाच्या तत्त्वाला जाणणारी आहे॥१७॥

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके॥१८॥**

सर्व जीव ब्रह्मदेवाचा दिवस उपस्थित झाल्यावर अव्यक्त कारणस्वरूपातून प्रकट होतात आणि रात्रीची वेळ उपस्थित झाल्यावर त्याच अव्यक्त कारण स्वरूपात लीन होऊन जातात॥१८॥

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे॥१९॥**

हे पार्थ! तेच जीवसमूह वारंवार उत्पन्न होऊन रात्रीच्या आगमनकाळात लीन होऊन जातात आणि पुन्हा दिवसाच्या आगमनकाळात नियमाच्या अधीन होऊन प्रादुर्भूत होतात॥१९॥

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति॥२०॥**

परंतु, पूर्वोक्त अव्यक्त भावापेक्षाही श्रेष्ठ आणि विलक्षण जो अनादी अव्यक्त भाव आहे, तो सर्व भूतांच्या विनष्ट झाल्यावर ही विनष्ट होत नाही॥२०॥

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम्।**
**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम॥२१॥**

त्या अव्यक्त भावालाच अक्षर तथा परमगती म्हणतात. ज्यास (त्या अव्यक्त भावास) प्राप्त करून संसारात पुनरागमन होत नाही, तेच माझे परमधाम अथवा नित्यस्वरूप आहे॥२१॥

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया।**
**यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम्॥२२॥**

परंतु हे पार्थ! ते परम पुरुष एकमात्र अनन्या भक्तीद्वारेच प्राप्त होण्यायोग्य आहेत, ज्यांच्या अभ्यंतरात समस्त भूत स्थित आहेत अथवा ज्याच्याद्वारे हे समग्र जगत व्याप्त आहे॥२२॥

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिञ्चैव योगिनः।**
**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ॥२३॥**

हे भरतश्रेष्ठ! योगिगण ज्या काळी देहाचा त्याग करून तथा ज्या मार्गाने गमन करून निश्चयच संसारात पुनरागमन आणि अपुनरागमनास प्राप्त होतात, त्या (कालाभिमानी देवतेच्या द्वारे पालित) मार्गाच्या विषयात सांगेन॥२३॥

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम्।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः॥२४॥**

अग्नी, ज्योती, शुभदिन, शुक्लपक्ष, सहा मासरूप उत्तरायणकाल—या समस्त कालांच्या मार्गात जे ज्या समस्त व्यक्ती प्रयाण करतात, त्या ब्रह्मास प्राप्त करतात॥२४॥

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते॥२५॥**

धूम, रात्र, कृष्णपक्ष, सहा मासरूप दक्षिणायनकाल—या देवतांच्या मार्गात गमन करणाऱ्या कर्मयोग्यांचे चंद्रज्योतिस्वरूप स्वर्गलोकाला उपभोग केल्यानंतर पुन्हा संसारात आगमन होते॥२५॥

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः॥२६॥**

कृष्ण आणि शुक्ल–जगाचे हे दोन मार्गच सनातन स्वीकार केले गेले आहेत. एकाच्या द्वारे मोक्ष प्राप्त होतो आणि दुसऱ्याच्या द्वारे संसारात पुनरावर्तन होते॥२६॥

**नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन॥२७॥**

हे पार्थ! या दोन मार्गांशी अवगत होऊन कोणीही योगी मोहग्रस्त होत नाही. म्हणून हे अर्जुन! सर्वदा योगपरायण व्हा॥२७॥

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम्।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम्॥२८॥**

माझ्या द्वारे कथित या तत्त्वाशी अवगत होऊन भक्तियोगी वेदपाठ, यज्ञानुष्ठान, तपस्या आणि दान इत्यादी कर्मांचे जे समस्त पुण्यफल शास्त्रात उपदिष्ट झाला आहे–त्याचे अतिक्रमण करून अप्राकृत, नित्य स्थानाला प्राप्त करतात॥२८॥

*ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे*

*श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः ॥८॥*
*इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'अक्षरब्रह्मयोगो' नाम अष्टमोऽध्यायः।*

॥अष्टम अध्याय समाप्त॥

# अध्याय ९

**अथ नवमोऽध्यायः**

**श्रीभगवानुवाच–**

**इदन्तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥१॥**

श्री भगवान म्हणाले–हे अर्जुन! मी दोषमुक्त तुम्हाला विज्ञानयुक्त, केवळ शुद्धभक्ति-लक्षणाने युक्त हे ज्ञान सांगेन, जे जाणून तुम्ही या दुःखमय संसारातून मुक्त होऊन जाल॥१॥

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम्।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्त्तुमव्ययम्॥२॥**

हे ज्ञान सर्व विद्यांचा राजा, गोपनीय विषयांचा राजा, अतिशय पवित्र, प्रत्यक्ष अनुभवयोग्य, विना कष्टाने साधित होण्यायोग्य आणि सनातन आहे॥२॥

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परन्तप।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि॥३॥**

हे परंतप! माझ्या भक्तिरूप या धर्माच्या प्रती श्रद्धाविहीन व्यक्तिगण मला प्राप्त न होऊन मृत्ययुक्त संसारपथात भ्रमण करीत राहतात॥३॥

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः॥४॥**

इन्द्रियातीत माझ्या मूर्ती द्वारा हे संपूर्ण जगत व्याप्त आहे आणि समस्त भूत (जीव) माझ्यात अवस्थित आहेत, परंतु मी त्यांच्यात अवस्थित नाही आहे॥४॥

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम्।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः॥५॥**

माझ्या असाधारण योगेश्वर्यास पाहा, भूतसमूह माझ्यात अवस्थित नाही आहेत. जरी माझे स्वरूप भूतधारक तथा भूतपालकाचे आहे, तथापि मी त्यांच्यात अवस्थित नाही॥५॥

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान्।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय॥६॥**

ज्या प्रकारे सर्वव्यापी आणि अपरिसीम असूनही वायू नेहमीच आकाशात स्थित आहे, त्याच प्रकारे, समस्त भूत माझ्यात अवस्थित आहेत–असे जाणा॥६॥

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम्।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्॥७॥**

हे कौन्तेय! प्रलयकालात समस्त भूत माझ्या प्रकृतीत लीन होतात आणि पुन्हा सृष्टिकाळात मी त्या सर्वांचे विशेष भावाने सृजन करतो॥ ७॥

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्॥८॥**

आपल्या त्रिगुणात्मिका प्रकृतीचा आश्रय करून मी प्राचीन स्वभाववश कर्म इत्यादीच्या परतंत्र या समग्र भूतसमूहाची (जीवसमूहाची) पुन्हा-पुन्हा सृष्टी करतो॥८॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनञ्जय।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु॥९॥**

हे धनंजय! या सृष्टी इत्यादी कर्मांत अनासक्त आणि उदासीनाप्रमाणे अवस्थित मला ते कर्म बांधत नाहीत॥९॥

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्।**
**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते॥१०॥**

हे कौन्तेय! माझ्या अध्यक्षतेखाली बहिरंगा प्रकृती किंवा माया शक्ती चर-अचरसहित संपूर्ण जगताला प्रसव करते, या कारणाने हे जगत पुन्हा-पुन्हा परिवर्त्तित (उत्पन्न) होते॥१०॥

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम्।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम्॥११॥**

मूर्ख व्यक्ती मनुष्याकृति-श्रीविग्रह-आश्रित माझ्या परमभावास न जाणून मायिक मनुष्यबुद्धीने भूत समुदायाचे ईश्वर माझ्याप्रति अवज्ञा करतात॥११॥

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः।**
**राक्षसीमासुरीञ्चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः॥१२॥**

ते निष्फल आशा, निष्फल कर्म आणि निष्फल ज्ञानाचे विक्षिप्त चित्त

होऊन मोहिनी, तामसी आणि राजसी प्रकृतीच्या आश्रित होतात॥१२॥

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः।**
**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम्॥१३॥**

हे पार्थ! परंतु महात्मागण दैवी प्रकृतीचा आश्रय करून, मला समस्त भूतांचे आदि कारण आणि अविनाशी जाणून, अनन्य चित्ताने निरंतर माझे भजन करतात॥१३॥

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते॥१४॥**

ते निरंतर माझ्या नाम-गुण-रूप-लीला इत्यादींचे कीर्तन करीत, दृढव्रती होऊन यत्न करीत आणि भक्तिसहित प्रणाम करीत नित्ययुक्त भावाने माझी उपासना करतात॥१४॥

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम्॥१५॥**

अन्य कोणी कोणी ज्ञानयज्ञाने यजन करीत करीत, कोणी अभेद भावाने, कोणी पृथक भावाने, कोणी नाना देवतारूपाने आणि कोणी सर्वात्मक भावाने माझी उपासना करतात॥१५॥

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम्।**
**मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम्॥१६॥**
**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः।**
**वेद्यं पवित्रमोङ्कार ऋक् साम यजुरेव च॥१७॥**
**गतिर्भर्त्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्॥१८॥**
**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च।**
**अमृतञ्चैचैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन॥१९॥**

हे अर्जुन ! मी अग्निष्टोम इत्यादी श्रौत कर्म आहे, वैश्वदेव इत्यादी स्मार्त कर्म आहे, मी श्राद्धाचे अन्न आहे, मी औषधी आहे, मी मंत्र आहे, मी घृत (तूप) आहे, मी अग्नी आहे, मी होम आहे. मीच जगताचा माता, पिता, विधाता आणि पितामह आहे. मी ज्ञेय वस्तू आहे, मी शोधक आहे, मी ॐकार आहे आणि मीच ऋक्, साम, यजुर्वेद इत्यादी आहे. मीच सर्वांची कर्मफलरूप गती, भर्त्ता (पती), प्रभू

(नियंता), साक्षी (शुभ-अशुभ द्रष्टा), निवास (आश्रयस्थान), शरण, सुहृत्, सृष्टी, स्थिती (आधार) आणि लय-क्रिया आहे. मी आधार आणि अव्यय बीज आहे, मीच ताप (ऊन) प्रदान करतो, वृष्टी करतो (पाऊस पाडतो) आणि त्याचे आकर्षण करतो. मी अमृत (मोक्ष) आहे, मी मृत्यू आहे आणि मीच स्थूल आणि सूक्ष्म समस्त वस्तू आहे॥१९॥

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते।**
**ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान् दिवि देवभोगान्॥२०॥**

त्रिवेदोक्त (तीन वेदांत सांगितलेले) सकाम कर्मपरायण व्यक्तिगण यज्ञांद्वारे माझी पूजा करून, यज्ञाचे अवशिष्ट सोमरस पान करून निष्पाप होऊन स्वर्ग-गमनाची प्रार्थना करतात. पुण्यफलाच्या रूपात इन्द्रलोकास प्राप्त करून ते दिव्य देवभोग्य भोगांचा उपभोग करतात॥ २०॥

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते॥२१॥**

ते त्या विशाल स्वर्गलोकाचा भोग केल्यानंतर पुण्य क्षीण झाल्यावर मृत्युलोकात पतित होतात. अशा प्रकारे तीन वेदांत सांगितलेल्या सकाम कर्मांचे अनुष्ठान करणारे पुन्हा पुन्हा संसारात आवागमनास (जन्म आणि मृत्यूस) प्राप्त होतात॥२१॥

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥२२॥**

अन्य कामनारहित आणि माझ्या चिंतेत निरत जे व्यक्तिगण सर्वतोभावेन माझी उपासना करतात, नित्य माझ्यात एकनिष्ठ त्या व्यक्तींचा योग आणि क्षेम मी वहन करतो॥२२॥

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः।**
**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्॥२३॥**

हे कौन्तेय! जे लोक श्रद्धापूर्वक अन्य देवतांची आराधना करतात, ते सुद्धा अविधिपूर्वक (माझी प्राप्ती करविणाऱ्या विधीने विहीन होऊन) माझीच आराधना करतात॥२३॥

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते॥२४॥**

कारण मीच समस्त यज्ञांचा भोक्ता तथा प्रभू आहे, परंतु लोक मला स्वरूपतः जाणत नाहीत, म्हणून ते संसारात प्रत्यावर्तन करतात॥२४॥

**यान्ति देवव्रता देवान् पितॄन् यान्ति पितृव्रताः।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम्॥२५॥**

देवपूजकगण देवलोकास प्राप्त होतात, पितृपूजकगण पितृलोकास प्राप्त होतात, भूतपूजकगण भूतलोकास प्राप्त होतात आणि माझी पूजा करणारे मलाच प्राप्त होतात॥२५॥

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥२६॥**

जे भक्तिपूर्वक मला पत्र, पुष्प, फळ इत्यादी प्रदान करतात, मी त्या शुद्धचित्त भक्तांच्या द्वारे भक्तिपूर्वक प्रदत्त त्या समस्त वस्तूंचे ग्रहण करतो॥२६॥

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥२७॥**

हे कौन्तेय! तुम्ही ज्या कर्माचे अनुष्ठान करता, जे काही भोजन करता, जो होम करता, जो दान करतो आणि जो पण तप करतो, त्या सर्वास मला समर्पण करा॥२७॥

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि॥२८॥**

अशा प्रकारे तुम्ही शुभ आणि अशुभ फलरूप कर्मबंधनातून मुक्त व्हाल आणि कर्मफलत्यागरूप योगाने युक्त होऊन मुक्तगणात विशिष्ट होऊन मला प्राप्त होशील॥२८॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्॥९-२९॥**

मी सर्व भूतांत (जीवांत) सम अर्थात समदर्शी आहे. न कोणी मला अप्रिय आहे आणि न कोणी प्रिय आहे. परंतु, जे भक्तिपूर्वक माझे भजन करतात, ते ज्याप्रकारे माझ्यात आसक्त आहेत, मी पण त्यांच्यात तशाच प्रकारे आसक्त असतो॥२९॥

**अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥३०॥**

जरी सुदुराचारी व्यक्तीसुद्धा अनन्य भजनपरायण होऊन माझे भजन

करतो, तर तो देखील साधूच मानण्याजोगा आहे, कारण तो माझ्या भक्तीत निश्चयात्मिका बुद्धीचा आहे॥३०॥

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति॥३१॥**

लवकरच तो धर्मात्मा होऊन शाश्वत शांती प्राप्त करतो. हे कौन्तेय! ही प्रतिज्ञा करून टाक की माझे भक्त कधीच नष्ट होत नाहीत॥ ३१॥

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥३२॥**

हे पार्थ! अधम कुलात उत्पन्न स्त्री, वैश्य, शूद्र इत्यादी जो कोणी पण असो, तो माझा आश्रय ग्रहण करून उत्तम गती प्राप्त करतो॥ ३२॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्॥३३॥**

सदाचारसंपन्न ब्राह्मणगण आणि भक्त राजर्षिगण परागती प्राप्त करतील, यात काय शंका आहे? म्हणून या अनित्य आणि दुःखपूर्ण मनुष्य लोकाला प्राप्त करून तुम्ही माझे भजन करा॥३३॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः॥३४॥**

माझे परायण चित्त असणारा, माझा भक्त आणि माझ्या पूजापरायण बना. अशा प्रकारे तुम्ही देह आणि मनाला माझ्यात नियुक्त करून माझ्या परायण होऊन मला प्राप्त व्हाल॥३४॥

*इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि*
*श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे*
*'राजगुह्ययोगो' नाम नवमोऽध्यायः।*
*॥नववा अध्याय समाप्त॥*

# अध्याय १०

## दशमोऽध्यायः

**श्रीभगवानुवाच–**
**भूय एव महाबाहो श्रृणु मे परमं वचः।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया॥१॥**

श्री भगवान म्हणाले–हे महाबाहो! पुन्हा पहिल्यापेक्षा श्रेष्ठ माझ्या वचनाला ऐका, ज्याला मी तुज प्रेमवानाच्या हिताच्या इच्छेने सांगेन॥ १॥

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणाञ्च सर्वशः॥२॥**

देवतागण तथा महर्षिगणदेखील माझ्या लीला–प्रभावास अर्थात प्रपंचात आविर्भूत होण्याच्या तत्त्वास जाणत नाहीत, कारण सर्व प्रकारे मी देवता आणि महर्षींचे आदी कारण आहे॥२॥

**यो मामजमनादिञ्च वेत्ति लोकमहेश्वरम्।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते॥३॥**

जो मला अनादी, जन्मरहित आणि सर्व लोकांच्या महेश्वर रूपात जाणतो, तो मनुष्यांमध्ये मोहशून्य होऊन सर्व पापांतून विमुक्त होतो॥ ३॥

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयञ्चाभयमेव च॥४॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः॥५॥**

बुद्धी, ज्ञान (आत्म–अनात्म विवेक), असम्मूढता (व्यग्रतेचा अभाव), सत्यवादिता, शम (अंतःकरणाचा संयम), दम (बाह्य इन्द्रियांचा संयम), सुख, दुःख, जन्म, मृत्यू, भय, अभय, अहिंसा, समता, तुष्टी, तप

(वेदात सांगितलेले शरीराचे क्लेश), दान, यश आणि अपयश–प्राण्यांचे हे समस्त नाना प्रकारचे भाव माझ्यामुळेच उत्पन्न होतात॥ ४–५॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः॥६॥**

मरीची आदी सात महर्षिगण, त्यांच्या पूर्वीचे सनक इत्यादी चार ब्रह्मर्षिगण आणि स्वायंभुवादी चौदा मनुगण–सर्व माझ्या हिरण्यगर्भ रूपातून मनःसंकल्प–मात्राने उत्पन्न झाले. या जगतात हे ब्राह्मण इत्यादी त्यांच्याच पुत्र–पौत्र किंवा शिष्य–प्रशिष्य रूपाने परिपूरित आहेत॥६॥

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः।**
**सोऽविकल्पेन योगेन युज्यते नात्र संशयः॥७॥**

जो माझ्या या समस्त विभूती आणि भक्तियोगाच्या विषयास यथार्थ रूपात जाणतात, ते माझ्या निश्चल तत्त्वज्ञानाद्वारा युक्त होतात–यात कोणतीही शंका नाही॥७॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः॥८॥**

मी सर्वांच्या उत्पत्तीचे कारण आहे, माझ्या मुळेच सर्व कार्यात प्रवृत्त होतात–अशा प्रकारे समजून पंडितगण भावयुक्त होऊन माझे भजन करतात॥८॥

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम्।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च॥९॥**

ज्यांनी आपले चित्त आणि प्राण मला समर्पित करून टाकले आहेत, ते सर्वदा एक–दुसऱ्यास माझे तत्त्व सांगत आणि माझ्या नाम, रूप इत्यादीचे कीर्तन करीत संतोष लाभ करतात आणि आनंदाचा लाभ करतात॥९॥

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते॥१०॥**

माझ्या नित्य–संयोगाच्या अभिलाषेने प्रीतिपूर्वक भजनशील त्या लोकांना मी तो बुद्धियोग प्रदान करतो, ज्याच्या द्वारे ते मला प्राप्त होतात॥

१०॥

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता॥११॥**

त्या लोकांवर अनुग्रह करण्याकरिताच त्यांच्या बुद्धिवृत्तीत स्थित होऊन मी प्रदीप्त ज्ञानरूप दीपकाच्या प्रकाशाद्वारे अज्ञानापासून उत्पन्न संसाररूप अंधकारास नष्ट करून टाकतो॥११॥

**अर्जुन उवाच–**

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम्॥१२॥**
**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे॥१३॥**

अर्जुन म्हणाले—आपण परम ब्रह्म, परम धाम आणि परम पवित्र अर्थात अविद्या इत्यादी मलाचा नाश करणारे आहात–मी हे जाणतो. समस्त ऋषीगण; यथा–देवर्षी नारद, असित, देवल, व्यास इत्यादी देखील आपल्याला नित्य–पुरुष, दिव्य, आदिदेव, अजन्मा आणि व्यापक म्हणतात आणि आपण स्वतःच मला असे सांगता आहात॥ १२–१३॥

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव।**
**न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः॥१४॥**

हे केशव! आपण जे काही मला सांगता आहात, त्या सर्वास मी सत्य मानतो, कारण हे भगवन ! आपले तत्त्व आणि जन्मास न तर देवतागण जाणतात न ही दानवगण॥१४॥

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते॥१५॥**

हे पुरुषोत्तम! हे भूतभावन (सर्व जीवांचे पिता)! हे भूतेश (जीवांचे ईश्वर किंवा प्रभू)! हे देव–देव (हे देवांचे देव, देवतांचे आराध्य)! हे जगत्पते (हे जगताचे नाथ आणि पालक)! आपण स्वतःच आपल्या शक्तीद्वारे स्वतःला जाणता॥१५॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि॥१६॥**

ज्या समस्त विभूतींद्वारे आपण या संपूर्ण जगतामध्ये व्याप्त होऊन अवस्थित आहात, केवळ आपणच आपल्या त्या समस्त दिव्य विभूतींना संपूर्णपणे सांगण्यास समर्थ आहात॥१६॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन्।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया॥१७॥**

हे योगमाया-शक्तिविशिष्ट! हे भगवान! कशा प्रकारे निरंतर चिंतन करता-करता मी आपल्याला जाणू शकेन आणि कोणत्या कोणत्या पदार्थांत कोणत्या-कोणत्या भावांनी आपण माझ्याद्वारे चिंतनीय आहात॥१७॥

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिञ्च जनार्दन।**
**भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम्॥१८॥**

हे जनार्दन! आपण आपल्या योगैश्वर्य आणि विभूतींद्वारे पुन्हा विस्तृतरूपात सांगा, कारण आपल्या कथामृताला श्रवण करताना माझी तृप्ती होत नाही॥१८॥

**श्रीभगवानुवाच-**

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे॥१९॥**

श्रीभगवान म्हणाले—हे कुरुश्रेष्ठ! मी तुम्हाला आपल्या प्रधान अलौकिक विभूतींसंबधी सांगीन, कारण माझ्या विभूतींच्या विस्ताराचा अंत नाही॥१९॥

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः।**
**अहमादिश्च मध्यञ्च भूतानामन्त एव च॥२०॥**

हे गुडाकेश! मी सर्व जीवांच्या हृदयात स्थित अंतर्यामी आहे आणि मीच सर्व जीवांच्या उत्पत्ती, स्थिती आणि प्रलयाचे कारण आहे॥२०॥

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी॥२१॥**

मी द्वादश आदित्यांमध्ये विष्णू नामक आदित्य, प्रकाश देणाऱ्यांमध्ये महाकिरणशाली सूर्य, समग्र वायुगणामध्ये मरीची नामक वायू आणि नक्षत्रांमध्ये चंद्र आहे॥२१॥

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः।**

**इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना॥२२॥**

मी वेदांमध्ये सामवेद, देवतांमध्ये इंद्र, इंद्रियांमध्ये मन आणि जीवांमध्ये चेतना (ज्ञानशक्ती) आहे॥२२॥

**रुद्राणां शङ्करश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम्।**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम्॥२३॥**

मी रुद्रांमध्ये शंकर, यक्ष आणि राक्षसांमध्ये कुबेर, अष्ट वसूंमध्ये अग्नी आणि पर्वतामध्ये सुमेरू आहे॥२३॥

**पुरोधसाञ्च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम्।**
**सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः॥२४॥**

हे पार्थ! मला पुरोहितांमध्ये प्रधान बृहस्पती जाणा. मी सेनापतींमध्ये कार्त्तिकेय आणि जलाशयांमध्ये समुद्र आहे॥२४॥

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम्।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः॥२५॥**

मी महर्षींमध्ये भृगू, वाक्यांमध्ये एकाक्षर ॐकार (प्रणव), यज्ञांमध्ये जपयज्ञ आणि स्थावरांमध्ये हिमालय आहे॥२५॥

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणाञ्च नारदः।**
**गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः॥२६॥**

मी वृक्षांत पिंपळ, देवर्षींमध्ये नारद, गंधर्वांमध्ये चित्ररथ, आणि सिद्धांमध्ये कपिल मुनी आहे॥२६॥

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम्।**
**ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम्॥२७॥**

मला घोड्यांमध्ये अमृत-मंथनातून उत्पन्न उच्चैःश्रवा, हत्तींमध्ये ऐरावत आणि मनुष्यांमध्ये नरपती जाणा॥२७॥

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक्।**
**प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः॥२८॥**

अस्त्रांमध्ये वज्र, गायींमध्ये कामधेनू, सर्पांमध्ये वासुकी आणि संतानोपत्तीचे कारण 'काम' देखील मीच आहे॥२८॥

**अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम्।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम्॥२९॥**

नागांमध्ये अनंत, जलचरांमध्ये वरुण, पितरांमध्ये अर्यमा नामक पितर

आणि दंड (शिक्षा) देणाऱ्यांमध्ये यमराजदेखील मीच आहे॥२९॥

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम्।**
**मृगाणाञ्च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम्॥३०॥**

मी दैत्यांमध्ये प्रल्हाद, वश करणाऱ्यांमध्ये काळ, पशूंमध्ये सिंह आणि पक्ष्यांमध्ये गरुड आहे॥३०॥

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम्।**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी॥३१॥**

मीच वेगवान आणि पवित्रकारी वस्तूंमध्ये पवन, शस्त्रधारी पुरुषांमध्ये शक्त्यावेश-लब्ध जीवविशेष परशुराम, जलचरांमध्ये मगर आणि नद्यांमध्ये गंगा आहे॥३१॥

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यञ्चैवाहमर्जुन।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम्॥३२॥**

हे अर्जुन! मीच आकाश इत्यादी सृष्ट वस्तूंचा आदी (उत्पत्ती), स्थिती आणि अंत आहे. मीच विद्यांमध्ये अध्यात्म विद्या अर्थात आत्मज्ञान तथा वक्त्याचा वाद (तत्त्व-फल निर्णायक परम सत्याची स्थापनाच उद्देश असलेला विचार), जल्प (एका पक्षाने आपले मताच्या स्थापण्यासाठी निरंतर विपक्षाच्या मतावर केलेला दोषारोप) आणि वितण्डा (सत्याला दूर ठेवून, विचार आणि युक्तीला सोडून परस्पर दोषारोप)-या तीन कथांचे तत्त्व-निर्णय करणारा वाद आहे॥ ३२॥

**अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च।**
**अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः॥३३॥**

मी अक्षरांमध्ये 'अ'-कार आणि समासांमध्ये द्वंद्व समास आहे. मीच संहार करणाऱ्यांमध्ये महाकाळ रुद्र आणि सृष्ट प्राण्यांमध्ये चतुर्मुख ब्रह्मदेव आहे॥३३॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम्।**
**कीर्त्तिः श्रीर्वाक् नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा॥३४॥**

मी सर्वहारी मृत्यू आणि भावी सहा विकारांमधील प्रथम विकार जन्म आहे. मी स्त्रियांमध्ये कीर्ती (ख्याती), श्री (कांती, सौंदर्य), सुसंस्कृत वाणी, स्मृती (स्मरण शक्ती), मेधा (तीक्ष्ण बुद्धी), धृती (धारण

करण्याची शक्ती) आणि क्षमा आहे॥३४॥

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम्।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः॥३५॥**

मी सामवेदांमध्ये इन्द्रस्तुतिरूप बृहत्–साम, छंदांमध्ये भगवत्–स्वरूप–प्रकाशिका वेदमाता गायत्री, महिन्यांमध्ये अग्रहायण (वर्षाचा पहिला महिना, मार्गशीर्ष) आणि ऋतुंमध्ये ऋतुराज वसंत आहे॥३५॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम्॥३६॥**

मी एकमेकांना फसवणाऱ्यांमध्ये जुगार आहे, तेजस्वीं मध्ये तेज आहे, विजयी होणाऱ्यांमध्ये जय आहे, उद्यमी पुरुषांमध्ये उद्यम आहे आणि बलवानांमध्ये बल आहे॥३६॥

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनञ्जयः।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः॥३७॥**

मी वृष्णींमध्ये वासुदेव आहे (अर्थात माझे वडील वसुदेव माझी विभूती आहेत), पाण्डवांमध्ये अर्जुन, मुनींमध्ये व्यास आणि कवींमध्ये शुक्राचार्य नामक कवी आहे॥३७॥

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम्॥३८॥**

मी दमनकारींमध्ये दंड, जिंकण्याची अभिलाषा करणाऱ्यांमध्ये नीती, गोपनीय ठेवणाऱ्यांमध्ये मौन आणि ज्ञानींमध्ये ज्ञान आहे॥३८॥

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्॥३९॥**

हे अर्जुन! समस्त जीवांमध्ये जे मूळ कारण अर्थात बीज आहे, तेदेखील मीच आहे. चर आणि अचर वस्तुंमध्ये अशी कोणती सत्ता नाही ज्याची सत्ता माझ्या विना असेल॥३९॥

**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परन्तप।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया॥४०॥**

हे परंतप! माझ्या दिव्य विभूंतींचा अंत नाही आहे, परंतु विभूतींचा हा विस्तार मी तुम्हाला संक्षेपपूर्वक ऐकवला॥४०॥

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा।**

**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसम्भवम्॥४१॥**

ऐश्वर्ययुक्त, सौंदर्य किंवा संपत्तियुक्त तथा शक्ति-प्रभाव इत्यादीने युक्त ज्या ज्या वस्तू आहेत, त्या समस्त वस्तूंना तुम्ही माझे तेज किंवा शक्तीच्या अंशाने उत्पन्न जाणा॥४१॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्॥४२॥**

अथवा, हे अर्जुन! या पृथक-पृथक उपदिष्ट ज्ञानाशी तुला काय प्रयोजन आहे? तु मात्र इतकेच जाण की मी आपल्या एकांशाने या समस्त जगताला धारण करून अवस्थित आहे॥४२॥

*इति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'विभूतियोगो' नाम दशमोऽध्यायः।*

*॥दहावा अध्याय समाप्त॥*

# अध्याय ११

## एकादशोऽध्यायः

**अर्जुन उवाच–**

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम्।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम॥१॥**

अर्जुन म्हणाले! मला अनुगृहीत करण्यासाठी आपल्याद्वारे जे परम गोपनीय आत्मविभूति–विषयक वचन सांगितले गेले आहे, त्यांच्याद्वारे माझा हा अज्ञानजनित मोह दूर झाला आहे॥१॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम्॥२॥**

हे कमलनयन ! मी आपल्याकडून भूतांच्या (जीवांच्या) उत्पत्ती आणि लयासंबंधी विस्तारपूर्वक ऐकले आणि आपले नित्य माहात्म्य सुद्धा ऐकले॥२॥

**एवमेतद् यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम॥३॥**

हे परमेश्वर! आपण आपल्या ऐश्वर्याच्या विषयी जसे सांगितले, तसेच आहे, तथापि हे पुरुषोत्तम! मी आपल्या ऐश्वर्यमय रूपास पाहण्याची इच्छा बाळगतो॥३॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम्॥४॥**

हे प्रभो! जर आपण असे मानता की माझ्या द्वारे आपल्या या ऐश्वर्य रूपास पाहणे संभवपर आहे, तेव्हा हे योगेश्वर! आपण मला आपले अविनाशी रूप दाखवावे॥४॥

**श्रीभगवानुवाच–**

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च॥५॥**

श्रीभगवान म्हणाले–हे पार्थ! माझ्या नाना प्रकारच्या आणि अनेक

वर्ण आणि आकृती असणाऱ्या शेकडो-हजारो दिव्य रूपांना पहा॥५॥

**पश्यादित्यान् वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत॥६॥**

हे भारत (परम पुण्यवान परमभक्त राजर्षी भरताच्या वंशात जन्म ग्रहण करणाऱ्या अर्जुना)! तुम्ही द्वादश आदित्य, अष्ट वसू, दोन अश्विनी कुमार, एकोणपन्नास मरुद्गण आणि पूर्वी कधी न पाहिलेल्या विविध आश्चर्यमय रूपांना पहा॥६॥

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद् द्रष्टुमिच्छसि॥७॥**

हे गुडाकेश (निद्रा अर्थात अज्ञानाचे स्वामी)! आता माझ्या या शरीरात एकत्र स्थित चर-अचरासहित संपूर्ण जगाला पहा आणि तुम्ही अन्य जे काही पाहण्याची इच्छा बाळगता, त्यालापण पाहा॥७॥

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्॥८॥**

परंतु निश्चितच तुम्ही आपल्या या प्राकृत नेत्रांद्वारे मला पाहण्यास समर्थ नाही आहात, म्हणून मी तुम्हाला दिव्य नेत्र प्रदान करतो आणि याद्वारे तुम्ही माझ्या ऐश्वरिक योगशक्तीचे दर्शन करा॥८॥

**संजय उवाच।**

**एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्॥९॥**

संजय म्हणाला-हे राजन! अशा प्रकारे म्हटल्यावर महायोगेश्वर श्रीहरीने अर्जुनाला आपले परम ऐश्वर्यमय रूप दाखविले॥९॥

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम्।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम्॥१०॥**
**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम्।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम्॥११॥**

अर्जुनाने भगवंताचे अनेक मुख आणि नेत्रांनी युक्त, अनेक आश्चर्यमय आकृती असणारे, अनेक दिव्य आभूषणांनी भूषित, अनेक दिव्य अस्त्रधारी, दिव्य माला आणि वस्त्रांनी सुशोभित, दिव्य गंधाद्वारे अनुलिप्त, सर्व आश्चर्यांनी युक्त, कान्तियुक्त, अनन्त आणि सर्वत्र मुख

असणारे रूप पाहिले॥१०-११॥

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद् युगपदुत्थिता।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः॥१२॥**

जर एक हजार सूर्यांची प्रभा एक सोबत आकाशात उदित (उदय) झाली, तर कदाचित ती प्रभा त्या महात्मा विश्वरूपाच्या प्रभेच्या समान होऊ शकेल॥१२॥

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा॥१३॥**

त्या वेळी अर्जुनाने देवांचे देव विश्वरूपाच्या त्या विराट शरीरात अनेक रूपांत विभक्त समग्र विश्वाला एकत्र स्थित पाहिले॥१३॥

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनञ्जयः।**
**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत॥१४॥**

त्यानंतर ते अर्जुन विस्मित आणि रोमांचित होऊन मस्तकाद्वारे प्रणाम करून कृतांजलिपूर्वक (हात जोडून) विश्वरूपधारी श्रीकृष्णाला अश्या प्रकारे म्हणू लागले॥१४॥

**अर्जुन उवाच-**

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान्।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्॥१५॥**

अर्जुन म्हणाले-हे देव! आपल्या शरीरात समस्त देवता, सर्व जरायुज इत्यादी जीवांचा समुदाय, कमलासनावर (कमळाच्या आसनावर) विराजमान ब्रह्मदेव, शिव, सर्व दिव्य ऋषींना आणि सर्पांना पाहतो आहे॥१५॥

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम्।**
**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप॥१६॥**

हे विश्वेश्वर (आदिपुरुष)! हे विश्वरूप! आपले असंख्य बाहू (हात), उदर (पोट), मुख आणि डोळे असणाऱ्या अनंत रूपांना सर्वत्रच पाहतो आहे, पुन्हा आपली आदि (सुरुवात), मध्य आणि अंत-काहीच पाहात नाही॥१६॥

**किरीटिनं गदिनं चक्रिणञ्च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम्।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्॥१७॥**

मी मुकूट, गदा आणि चक्राने युक्त, पूर्णरूपेण प्रकाशमान तेजपुंजस्वरूप, दुर्दर्शनीय, प्रज्वलित अग्नी आणि सूर्याच्या समान ज्योतिर्मय आणि अपरिसीम आपल्याला सर्वत्र पाहतो आहे॥१७॥
सारार्थवर्षिणी प्रकाशिका वृत्ती–विश्वरूपाला पाहून अर्जुन म्हणतायत–"हे विश्वेश्वर! आपले श्रीअंग, मस्तक, किरीट (मुकूट), गदा, चक्र इत्यादींना कोटी सूर्यांसारखे तेजःपुंजाने पूर्ण पाहतो आहे. यांच्या कडे दृष्टिपात करणे दुःसाध्य आहे. मी सर्वच दिशांना याचे दर्शन करीत आहे. याचा आदि–अंत काहीच निश्चय करू शकत नाही." जर असे म्हटले की मग अश्या रूपाचे अर्जुन कशा प्रकारे दर्शन करतो आहे, तर याचे उत्तर असे आहे की भगवंतानी अनुग्रहपूर्वक अर्जुनाला दिव्य–चक्षू दिले होते, त्याद्वारे ते सहज रूपात त्याचे दर्शन करीत होते॥१७॥

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे॥१८॥**

आपण मुक्त पुरुषांद्वारे जाणण्यायोग्य परम अक्षरतत्त्व (परब्रह्म) आहात, आपण या विश्वाचे परम आश्रय आहात, आपण अविनाशी आणि सनातन धर्मरक्षक आहात आणि आपण सनातन पुरूष आहात–असे माझे मत आहे॥१८॥

**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम्।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्॥१९॥**

मी आदि–मध्य–अंतरहित, अनन्त वीर्यशाली, अनंत भुजायुक्त (हात असणाऱ्या), चंद्र–सूर्य यांच्यासारखे नेत्रयुक्त, प्रज्वलित अग्नीच्या समान मुख असणाऱ्या आणि आपल्या तेजाने या विश्वाला संताप देणाऱ्या आपल्याला पाहतो आहे॥१९॥
भावानुवाद–महाविस्मय समुद्रात निमग्न अर्जुनाद्वारे 'अनादि' इत्यादी वाक्याच्या प्रयोगाने पुनरुक्ती दोष होत नाही, कारण असे पण म्हटले गेले आहे की प्रमाद, विस्मय आणि हर्षात एका विषयाची द्विरुक्ती, त्रिरुक्ती इत्यादी दूषणीय नाही आहे॥१९॥

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।**
**दृष्ट्वाद्भुतं रूपमिदं तवोग्रं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥२०॥**

एकटे आपल्यापासूनच स्वर्ग आणि पृथ्वीच्या मधला भाग अर्थात

अंतरिक्ष आणि सर्व दिशा व्याप्त आहेत. हे महात्मन् ! आपल्या या अद्भुत मूर्तीला पाहून तिन्ही लोक अत्यंत भयभीत आणि व्यथित होत आहेत॥२०॥

**अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः॥ २१॥**

हे समस्त देवगण आपल्यात प्रवेश करित आहेत, कोणी कोणी भयभीत होऊन हात जोडून स्तव करते आहे, महर्षी आणि सिद्धगण स्वस्ती वाक्यांचे उच्चारण करून प्रचुर मनोरम स्तवांद्वारे आपले दर्शन करित आहेत॥२१॥

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च।**
**गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे॥२२॥**

जे (अकरा) रुद्र आणि (बारा) आदित्यगण , अष्ट वसू, साध्य देवगण, दोन अश्विनीकुमार, मरुद्गण, पितृगण, गंधर्व, यक्ष, राक्षस आणि सिद्धगण–हे सर्व विस्मित होऊन आपल्याला पाहात आहेत॥ २२॥

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम्।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम्॥२३॥**

हे महाबाहो! अनेक डोळे असणारे, असंख्य हात, छाती आणि पाय असणारे, अनेक पोट असणारे आणि अनेक दातांमुळे विकराळ आपल्या विराट रूपाला पाहून सर्व लोक आणि मी अत्यंत भयभीत होत आहे॥२३॥

**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम्।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो॥ २४॥**

हे विष्णो! आकाशव्यापी, तेजोमय, अनेक वर्ण असणाऱ्या, पसरवलेल्या मुखांच्या आणि प्रज्वलित विशाल नेत्र असणाऱ्या आपल्याला पाहून भयभीत अंतःकरणाचा मी धैर्य आणि शांती प्राप्त करू शकत नाही॥२४॥

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि।**

**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास॥२५॥**

आपल्या विकराळ दातांना आणि प्रलयकालीन अग्नीच्या समान मुखांना पाहून मी दिशांचा निर्णय करू शकत नाही आहे आणि सुखही प्राप्त करू शकत नाही आहे. म्हणून हे देवेश! हे जगन्निवास! आपण प्रसन्न व्हा॥२५॥

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः॥२६॥**
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु सन्दृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः॥२७॥**

हे धृतराष्ट्राचे पुत्रगण समस्त राजांना सोबत घेऊन भीष्म, द्रोण, कर्ण आणि आमच्या पक्षाच्या योद्धागणासोबतच आपल्याकडे तीव्र गतीने धावित होऊन आपल्या विकराळ दंतयुक्त भयानक मुखगुहांमध्ये प्रवेश करित आहेत, कोणी कोणी चूर्णितमस्तक होऊन आपल्या दातांच्या मध्यभागामध्ये संलग्न दिसत आहेत॥२६-२७॥

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभितो ज्वलन्ति॥२८॥**

ज्याप्रकारे नद्यांचे पाणी अत्यधिक वेगाने समुद्राकडे अभिमुख होऊन समुद्रातच प्रवेश करते, त्या प्रकारे हे समस्त नरवीर सर्वत्र प्रज्वलित आपल्या मुखांत प्रवेश करत आहेत॥२८॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः॥२९॥**

ज्याप्रकारे पतंगे मरण्यासाठी प्रबळ वेगाने प्रज्वलित अग्नीत प्रवेश करतात, त्याच प्रकारे हे लोकपण मरण्यासाठी अतिशय वेगाने आपल्या मुखांत प्रविष्ट होत आहेत॥२९॥

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान् समग्रान् वदनैर्ज्वलद्भिः।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो॥३०॥**

हे विष्णो! आपण आपल्या प्रज्वलित मुखांद्वारे समस्त लोकांना ग्रास करित त्यांना सर्व दिशांनी पुन्हा पुन्हा अवलेहन करित (चाटता) आहात. आपली तीव्र ज्योती संपूर्ण जगताला तेजाद्वारे व्याप्त करून संतप्त करित आहे (तापवित आहे)॥३०॥

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम्॥३१॥**

हे देवश्रेष्ठ! आपल्याला माझा नमस्कार आहे, आपण प्रसन्न व्हावे. कृपया मला सांगावे की उग्ररूपधारी आपण कोण आहात? मी आदि कारण आपल्याला विशेष रूपाने जाणण्याची इच्छा करतो आहे, कारण आपल्या प्रवृत्तीला मी जाणत नाही॥३१॥

**श्रीभगवानुवाच—**

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान् समाहर्तुमिह प्रवृत्तः।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः॥३२॥**

श्रीभगवान म्हणाले—मी लोकांचा नाश करणारा अत्युत्कट काल आहे आणि लोकांचा संहार करण्यासाठीच आता प्रवृत्त झालो आहे. प्रतिपक्षामध्ये जे योद्धागण आहेत, ते तुमच्याद्वारे मारले न जाता सुद्धा जीवित राहाणार नाहीत॥३२॥

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम्।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्॥३३॥**

म्हणून तुम्ही उठा आणि शत्रूंना जिंकून कीर्ती लाभ करा आणि समृद्ध राज्याचा भोग करा. हे समस्त माझ्याद्वारे पूर्वीच मारले गेले आहेत. म्हणून हे सव्यसाचिन्! तुम्ही निमित्तमात्र बना॥३३॥

**द्रोणञ्च भीष्मञ्च जयद्रथञ्च कर्णं तथान्यानपि योधवीरान्।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान्॥३४॥**

माझ्या द्वारे पूर्वीच विनाशप्राप्त द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण आणि इतर वीर योध्यांचा पण तुम्ही वध करा, व्यथित होऊ नका. तुम्ही युद्धात शत्रुला जिंकाल, म्हणून युद्ध करा॥३४॥

**सञ्जय उवाच—**

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य॥११–३५॥**

संजय म्हणाले—भगवान श्रीकेशवांच्या या वाक्यांना ऐकून कम्पायमान अर्जुनाने हात जोडून, नमस्कार करून आणि अत्यंत भयभीत होत पुन्हा प्रणाम करून गद्गद होऊन श्रीकृष्णाला म्हटले॥३५॥

**अर्जुन उवाच—**

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः॥३६॥**

अर्जुन म्हणाले–हे हृषीकेश! आपले नाव, रूप, गुण इत्यादींच्या कीर्तनाने जग अत्यंत हर्षित होते आहे आणि आपल्या प्रति अनुरागाला प्राप्त होते आहे, राक्षसगण भयभीत होऊन चारी दिशांना पलायन करीत आहेत आणि सिद्धांचा समुदाय आपल्याला नमस्कार करीत आहे–हे सर्व युक्तियुक्तच आहे॥३६॥

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे।**
**अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्॥३७॥**

हे महात्मन! हे देवेश! हे अनन्त! हे जगन्निवास! आपण ब्रह्मदेवापेक्षाही श्रेष्ठ तत्त्व, आदि सृष्टिकर्ता आहात. आपणच सत् आणि असत् यांच्या अतीत (पलीकडचे) अक्षर–तत्त्व ब्रह्म आहात, म्हणून ते आपल्याला का नमस्कार करणार नाहीत?॥३७॥

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप॥३८॥**

आपण आदिदेव, प्राचीनतम पुरुष, आणि विश्वाचे एकमात्र लयस्थान, ज्ञाता आणि ज्ञेय तथा परम धाम आहात. हे अनन्तरूप! आपल्याद्वारे हे विश्व व्याप्त आहे॥३८॥

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते॥३९॥**

आपण वायू, यम, अग्नी, वरुण, चंद्र, प्रजापती आणि ब्रह्मदेवाचे पिता आहात. म्हणून आपल्याला माझा हजार वेळा प्रणाम आहे, पुन्हा पुन्हा नमस्कार आहे॥३९॥

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः॥४०॥**

हे सर्वस्वरूप! आपल्याला पुढून, पाठीमागून आणि सर्व दिशांकडून नमस्कार आहे. हे अनंतवीर्य आणि महापराक्रमी! आपण समस्त जगाला व्याप्त केले आहे, म्हणून आपण सर्वस्वरूप आहात॥४०॥

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि॥४१॥**

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु।**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम्॥४२॥**

आपल्या या महिमेला न जाणून मी सखा मानून प्रमादवश अथवा प्रणयवश हट्टाने आपल्याला जे हे कृष्ण! हे यादव! हे सखे! इत्यादी संबोधन केले होते आणि हे अच्युत! परिहासासाठी (विनोदासाठी) एकांतात अथवा अन्यान्य बंधूंच्या समक्ष विहार, शयन, आसन, भोजन इत्यादीच्या समयी आपण माझ्याद्वारे जसे असन्मानित झाले आहात, त्या सर्वांसाठी मी आपल्या कडून अपरिसीम क्षमा-याचना करतो॥४१-४२॥

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान्।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव॥११-४३॥**

हे अनुपम प्रभावविशिष्ट! आपण या चराचर विश्वाचे पिता, पूज्य, गुरु आणि गुरुश्रेष्ठ आहात. तिन्ही लोकांत जेव्हा आपल्या समान कोणी नाही, तर भले आपल्यापेक्षा श्रेष्ठ कोण असेल?॥४३॥

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम्।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम्॥४४॥**

म्हणून मी आपल्या चरणी आपल्या शरीराने प्रणिपात करून प्रणाम करीत स्तुत्य आपण परमेश्वराकडे प्रसन्न होण्याची प्रार्थना करतो. हे देव! जसा पिता पुत्राला, सखा सख्याला आणि प्रियकर आपल्या प्रियेला क्षमा करतो, तसेच आपण ही क्षमा करण्यास समर्थ आहात॥४४॥

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास॥४५॥**

हे देव! आधी कधी न पाहिलेले आपले हे रूप (विश्वरूप) पाहून मी आनंदित होत आहे. हे देवेश! आपण आपले तेच रूप (चतुर्भुज रूप) मला दाखवावे. हे जगन्निवास! आपण प्रसन्न व्हा॥४५॥

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते॥४६॥**

मी आपल्याला त्या मुकुटधारी, गदाधारी, चक्रधारी रूपातच पाहण्याची इच्छा करतो. हे सहस्त्रबाहो! हे विश्वमूर्ते! आपण त्या चतुर्भुज रूपातच प्रकट व्हावे॥४६॥

श्रीभगवानुवाच—

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात्।**
**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्॥४७॥**

श्रीभगवान म्हणाले—हे अर्जुन! मी प्रसन्न होऊन आपल्या आत्मयोग बलाने तेजोमय, विश्वरूपी, अनन्त, आदि या श्रेष्ठ रूपास दाखविले, जे तुमच्या अतिरिक्त अन्य कोणाद्वारे पहिले नसेल॥४७॥

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर॥४८॥**

हे कुरुप्रवीर! तुमच्या अतिरिक्त अन्य कोणी वेदाध्ययन, यज्ञ, दान, क्रिया आणि उग्र तपस्यांद्वारे या लोकात अश्या विश्वरूपविशिष्ट मला दर्शन करण्यास समर्थ नाही आहे॥४८॥

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम्।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य॥४९॥**

माझ्या या भयंकर रूपास पाहून तुम्ही भय आणि विमूढ भावास प्राप्त होऊ नका. तुम्ही पुन्हा भयरहित होऊन आणि प्रीतियुक्त मनाचे बनून त्याच चतुर्भुज रूपाचे प्रकृष्ट रूपात दर्शन करा॥४९॥

सञ्जय उवाच—

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा॥५०॥**

संजय म्हणाले—महात्मा वासुदेव श्रीकृष्णाने असे म्हणून अर्जुनाला पुन्हा आपले तेच चतुर्भुज रूप दाखवले. त्यांनी परत प्रसन्नमूर्ती धारण करून भयभीत अर्जुनाला आश्वस्त केले॥५०॥

अर्जुन उवाच—

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः॥५१॥**

अर्जुन म्हणाले—हे जनार्दन! आपल्या या मनोहर नराकार रूपास पाहून आता मी प्रसन्नचित्त झालो आहे आणि आपल्या पूर्वस्थितीस प्राप्त झालो आहे॥५१॥

श्रीभगवानुवाच—

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम।**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः॥५२॥**

श्री भगवान म्हणाले–तुम्ही माझ्या या अत्यंत दुर्लभ रूपाचे दर्शन केले, देवगण पण या दर्शनाची नित्य अभिलाषा करतात॥५२॥

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥५३॥**

तुम्ही मला ज्या रूपात पाहिले, त्या रूपात मी न वेद, तपस्या तथा दानाद्वारे आणि न यज्ञाद्वारे दर्शनीय आहे॥५३॥

**भक्त्या त्वनन्यया शक्यो अहमेवंविधोऽर्जुन।**
**ज्ञातुं द्रष्टुञ्च तत्त्वेन प्रवेष्टुञ्च परन्तप॥५४॥**

हे परंतप अर्जुन! एकमात्र अनन्या भक्तीच्या द्वारेच असा रूपविशिष्ट मी तत्त्वतः जाणण्या, पाहण्या आणि प्रवेश करण्या योग्य होतो॥५४॥

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव॥५५॥**

हे पाण्डव! जे माझ्या साठीच कर्म करतात, माझ्या परायण आहेत, माझ्या श्रवण–कीर्तन इत्यादि भक्तीच्या विविध अंगांचे पालन करणारे आहेत, आसक्तिरहित आहेत आणि सर्व भूतांच्या (जीवांच्या) प्रती राग (आसक्ती)–द्वेषरहित आहे, ते मला प्राप्त होतात॥५५॥

*इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि*
*श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे*
*'विश्वरूपदर्शनयोगो' नाम एकादशोऽध्यायः।*
*॥अकरावा अध्याय समाप्त॥*

# अध्याय १२

## द्वादशोऽध्यायः

**अर्जुन उवाच–**

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः॥१॥**

अर्जुन म्हणाला–आपल्या पूर्वोक्त उपदेशानुसार जे भक्तयोगी निष्ठायुक्त होऊन निरंतर श्यामसुन्दर रूपाची उपासना करतात आणि जे निर्विशेष अक्षर ब्रह्माची उपासना करतात, त्या दोघांमध्ये कोण श्रेष्ठ योगवेत्ता आहे? ॥१॥

**श्रीभगवानुवाच–**

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः॥२॥**

श्रीभगवान म्हणाले–जे निर्गुणा श्रद्धेने माझ्या श्यामसुन्दर स्वरूपात मनोनिवेश (मन आविष्ट) करून अनन्य भक्तिसहित निरंतर माझी उपासना करतात, ते श्रेष्ठ योगविद् (योगवेत्ता) आहेत, हेच माझे अभिमत आहे॥२॥

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते।**
**सर्वत्रगमचिन्त्यञ्च कूटस्थमचलं ध्रुवम्॥३॥**
**सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः।**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः॥४॥**

परंतु, जे इंद्रियांना संयमित करून सर्व वस्तूंमध्ये समदृष्टिसम्पन्न होऊन आणि सर्व भूतांच्या (जीवांच्या) कल्याणात रत होऊन, अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य, कूटस्थ, अचल आणि नित्य निर्विशेष अक्षर ब्रह्मस्वरूपाची उपासना करतात, ते मलाच प्राप्त होतात॥३–४॥

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्॥**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते॥५॥**

निर्विशेष ब्रह्मस्वरूपात आसक्तचित्त व्यक्तींना अधिकतर क्लेश होतो, कारण देहाभिमानींच्या द्वारा अव्यक्तविषयक निष्ठा दुःखपूर्वक प्राप्त होते॥५॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्परः।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥६॥**
**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।**
**भवामि न चिरात् पार्थ मय्यावेशितचेतसाम्॥७॥**

परंतु जे लोक समस्त कर्म माझ्या प्राप्तीसाठीच अर्पण करून माझ्या परायण होऊन अनन्य भक्तियोगाने माझे ध्यान करतात माझे भजन करात, हे पार्थ! माझ्यात आसक्तचित्त त्या लोकांना शीघ्रच मी त्या मृत्युरूप संसार–सागरातून पार करून टाकतो॥६–७॥

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्द्ध्वं न संशयः॥८॥

श्यामसुन्दराकार माझ्यातच मनाला स्थिर कर, माझ्यात बुद्धीला अर्पण कर, अशा प्रकारे देहाचा अंत झाल्यावर माझ्याच जवळच वास करशील–यात काहीच संशय नाही.॥८॥

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय॥९॥**

हे धनंजय! आणि जर तू माझ्यात चित्तास स्थिर भावाने स्थापित करू शकला नाहीस, तर अभ्यासयोगाद्वारे मला प्राप्त करण्याची इच्छा कर॥९॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि॥१०॥**

जर तू अभ्यासयोगामध्येही असमर्थ असशील, तर माझ्या कर्मपरायण बन. माझ्या प्रीतीसाठी श्रवण–कीर्तन इत्यादी कर्मांना केल्यानेच तू सिद्धी लाभ करशील॥१०॥

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्॥११॥**

जर तुम्ही या अभ्यास योगास करण्यास अक्षम असाल, तर माझ्यात समस्त कर्मांना अर्पणरूप योगाचा आश्रय करून संयत चित्ताने समस्त कर्मांच्या फलाचा त्याग करा॥११॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम्॥१२॥**

कारण, अभ्यासापेक्षा श्रेष्ठ आहे–ज्ञान (मयि बुद्धिं निवेशय – या

संदर्भात कथित 'ध्यान प्रतिपादक शास्त्रानुशीलनरूप' मनन), या ज्ञानापेक्षा माझे स्मरणरूप ध्यान श्रेष्ठ आहे, ध्यानाने कर्मफलत्याग होतो अर्थात स्वर्ग इत्यादी सुख आणि मोक्षाची आकांक्षा राहात नाही आणि त्यागानंतर शांती प्राप्त होते॥१२॥

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च।**
**निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी॥१३॥**
**सन्तुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः॥१४॥**

सर्व भूतांच्या (जीवांच्या) प्रति द्वेषरहित, मित्रभावापन्न, कृपाळू, पुत्र-कलत्र इत्यादींमध्ये ममताशून्य, देह इत्यादींमध्ये अहंकारशून्य, सुख आणि दुःखात समभावापन्न, क्षमाशील, सर्वदा प्रसन्नचित्त, भक्तियोगयुक्त, संयत इन्द्रिये असणारा, दृढसंकल्पवान, आणि माझ्यात मन, बुद्धी अर्पण करणारे माझा जो भक्त आहे, तो मला प्रिय आहे॥१३-१४॥

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः॥१५॥**

ज्याच्याद्वारे कोणाला उद्वेग प्राप्त होत नाही आणि जो कोणाद्वारे उद्वेगाला प्राप्त होत नाही आणि जो प्राकृत हर्ष, असहिष्णुता, भय आणि उद्वेगापासून मुक्त आहे, तोच माझा प्रिय आहे॥१५॥

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः।**
**सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः॥१६॥**

व्यवहारिक कार्यांत अपेक्षाशून्य, पवित्र, निपुण, अनासक्त, उद्वेगरहित आणि भक्ति-प्रतिकूल समस्त उद्यमांनी रहित माझे जे भक्त आहेत, ते माझे प्रिय आहेत॥१६॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः॥१७॥**

जो लौकिक प्रिय वस्तू प्राप्त झाल्यावर हर्षित होत नाही आणि न अप्रिय वस्तू प्राप्त झाल्यावर द्वेष करतो, जो प्रिय वस्तू नष्ट झाल्यावर शोक करत नाही आणि अप्राप्त वस्तूची आकांक्षा पण करत नाही, जो पाप आणि पुण्य - दोघांच्या परित्याग करणारा आहे आणि जो माझ्याप्रति भक्तिमान आहे, तो भक्तच माझा प्रिय आहे॥

१७॥

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः॥१८॥**
**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित्।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान् मे प्रियो नरः॥१९॥**

जो भक्तिमान मनुष्य शत्रू आणि मित्र, मानापमान, शीत–उष्ण, सुख–दुःखात समभावापन्न आहे; ज्याची वाणी संयत आहे; जे काही प्राप्त होते, त्याद्वारेच संतुष्ट राहातो; गृहासक्तिरहित तथा स्थिर बुद्धीचा आहे; तोच माझा प्रिय आहे॥१८–१९॥

**ये तु धर्मामृतमिदं यथोक्तं पर्युपासते।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः॥२०॥**

आणि जे उक्त या धर्मरूप अमृताची उपासना करतात, ते सर्व श्रद्धावान माझ्या परायण भक्तगण माझे अत्यंत प्रिय आहेत॥२०॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि**
**श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**
**ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'भक्तियोगो' नाम**
**द्वादशोऽध्यायः।**
**॥बारावा अध्याय समाप्त॥**

# अध्याय १३

## त्रयोदशोऽध्यायः

**अर्जुन उवाच–**

**प्रकृतिं पुरुषञ्चैव क्षेत्रं क्षेत्रज्ञमेव च।**
**एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव॥१॥**

अर्जुन म्हणाले–हे केशव! मी प्रकृती, पुरुष, क्षेत्र, क्षेत्रज्ञ, ज्ञान आणि ज्ञेय–या सर्वांना जाणण्याची इच्छा करतो॥१॥

**श्रीभगवानुवाच–**

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः॥२॥**

श्री भगवान म्हणाले—हे कौन्तेय! हे शरीर 'क्षेत्र' नामाने अभिहित होते आणि जो हे जाणतो, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या ज्ञानाने संपन्न व्यक्तिगण 'क्षेत्रज्ञ' नामाने अभिहित करतात॥२॥

**क्षेत्रज्ञञ्चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम॥३॥**

हे भारत! समस्त क्षेत्रांमध्ये मलाच क्षेत्रज्ञ जाणा. देहरूप क्षेत्र तथा जीव आणि ईश्वररूप क्षेत्रज्ञाचे जे तत्त्वज्ञान आहे, माझ्या मतात तेच ज्ञान आहे॥३॥

**तत् क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत्।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु॥४॥**

ते क्षेत्र काय आहे, ते कसे आहे, त्याचा विकार कसा आहे, ते कोणत्या प्रयोजनाने, कश्यापासून उत्पन्न झाले आहे आणि तो क्षेत्रज्ञ जे स्वरूप असणारा आणि प्रभाव असणारा आहे, हे सर्व मला संक्षेपात ऐकवा॥४॥

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक्।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः॥५॥**

ते तत्त्व ऋषींच्या द्वारे अनेक प्रकारे वर्णित झाले आहे, विविध वेदवाक्यांद्वारे पृथक–पृथक (वेगवेगळया) रूपात कीर्तित झाले आहे

आणि युक्तिपूर्ण, निश्चित सिद्धान्तयुक्त वाक्यांमध्ये ब्रह्मसुत्राच्या पदांद्वारे सुद्धा कीर्तित झाले आहे॥५॥

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च।**
**इन्द्रियाणि दशैकञ्च पञ्च चेन्द्रियगोचराः॥६॥**
**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः।**
**एतत् क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम्॥७॥**

पाच महाभूत, अहंकार, बुद्धी, प्रकृती, एकादश इंद्रिय, शब्द-स्पर्श इत्यादी पाच इंद्रियांचे विषय (तन्मात्रा); इच्छा, द्वेष, सुख, दुःख, शरीर, ज्ञान आणि धैर्य—या विकारांसोबत संक्षेपात क्षेत्राच्या विषयात सांगितले आहे॥६-७॥

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम्।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः॥८॥**
**इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम्॥९॥**
**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु।**
**नित्यञ्च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु॥१०॥**
**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि॥११॥**
**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम्।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा॥१२॥**

मानशून्यता, दम्भहीनता, अहिंसा, क्षमा, सरलता, सद्गुरूची सेवा, आतील-बाहेरची पवित्रता, चित्ताची स्थिरता, देह-इन्द्रियांचा संयम, शब्द-स्पर्श इत्यादी विषयभोगांपासून वैराग्य, अहंकारशून्यता, जन्म-मृत्यू-जरा-व्याधी-दुःख इत्यादींमध्ये दुःखरूप दोषाचे अनुदर्शन, पुत्र-स्त्री-गृह इत्यादींमध्ये आसक्तीचा त्याग आणि दुसऱ्याच्या सुख-दुःखात आवेशाचा अभाव, प्रिय-अप्रिय वस्तूच्या प्राप्तीमध्ये चित्ताचे सम राहणे आणि माझ्यात ऐकान्तिक निष्ठापूर्वक अव्यभिचारिणी भक्ती, निर्जनवासामध्ये प्रीती, विषयासक्त मनुष्यांच्या संघात अरुची, आत्मविषयक ज्ञानाची नित्य आलोचना (परीक्षण), तत्त्वज्ञानाच्या प्रयोजन मोक्षाची आलोचना-हे सर्व ज्ञान म्हटले गेले आहे आणि जे

याच्या विपरीत आहे, ते अज्ञान आहे॥८–१२॥

**ज्ञेयं यत्तत् प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते।**
**अनादि मत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते॥१३॥**

जे जाणण्यायोग्य आहे आणि ज्यास जाणल्यावर मोक्ष प्राप्त होतो, त्यास सविस्तर सांगेन–ते आदिरहित, माझे आश्रित ब्रह्म कार्यातीत आणि कारणातीत म्हटले जाते॥१३॥

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम्।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति॥१४॥**

ते ब्रह्म सर्वत्र हात, पाय, डोळे, मस्तक, मुख आणि कान असणारे आहे आणि जगात सर्व वस्तूंना व्याप्त करून स्थित आहे॥१४॥

**सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम्।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च॥१५॥**

ती ज्ञेय वस्तू सर्व इन्द्रिये आणि गुणांची प्रकाशक आहे, परंतु स्वतः प्राकृत (जड) इंद्रियांपासून रहित आहे, ती अनासक्त असूनही सर्वांचा पालक प्राकृत गुणरहित असूनही षडैश्वर्य गुणांचा भोक्ता आहे॥१५॥

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत्॥१६॥**

ती तत्त्ववस्तू सर्व जीवांच्या आत आणि बाहेर वर्तमान आहे, तिच्यापासूनच स्थावर जङ्गमात्मक जग आहे, अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे ती दुर्ज्ञेय आहे आणि एकासोबतच दूर आणि निकट स्थित आहे॥ १६॥

**अविभक्तञ्च भूतेषु विभक्तमिव च स्थितम्।**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च॥१७॥**

ती वस्तू अविभक्त (अखंड) असूनही सर्व जीवांमध्ये विभक्त (खंड) असल्याप्रमाणे अवस्थित आहे. तुम्ही तिला सर्व भूतांचे (जीवांचे) पालक, संहारक आणि सृष्टिकर्ता जाणा॥१७॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम्॥१३–१८॥**

ती सर्व ज्योतिर्मय वस्तूंचीही प्रकाशक आहे, ती अज्ञानापासून अतीत आहे, ती ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञानगम्य आहे आणि सर्वांच्या हृदयात

अधिष्ठित आहे॥१८॥

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयञ्चोक्तं समासतः।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते॥१९॥**

अश्या प्रकारे क्षेत्र, ज्ञान, आणि ज्ञेय संक्षेपात सांगितले गेले आहेत. माझे भक्त या सर्वांशी अवगत होऊन प्रेमाभक्ती प्राप्त करण्याच्या योग्य होतात॥१९॥

**प्रकृतिं पुरुषञ्चैव विद्ध्यनादी उभावपि।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान्॥२०॥**

प्रकृती आणि पुरुष दोघानांही अनादी जाणा आणि विकारसमूह आणि गुणसमूहास प्रकृतीपासूनच उत्पन्न जाणा।२०॥

**कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते॥२१॥**

जडीय कार्य आणि कारणाच्या कर्तृत्वाच्या विषयात प्रकृतीला हेतू (कारण) म्हटले जाते आणि जडीय सुख-दुःख आदीच्या भोक्तृत्वाच्या विषयात पुरुष अर्थात बद्धजीवालाच हेतू (कारण) म्हटले जाते॥२१॥

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान् गुणान्।**
**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु॥२२॥**

प्रकृतीमध्ये अवस्थित होऊनच पुरुष प्रकृतीपासून उत्पन्न विषयसमूहाचा भोग करतात आणि प्रकृतीच्या गुणांचा संगच सत्-असत् योन्यांमध्ये या पुरुषाच्या जन्माचे कारण आहे॥२२॥

**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः॥२३॥**

या देहात जीवात्म्यापेक्षा भिन्न पुरुष साक्षी, अनुमोदनकारी, धारक, पालक, महेश्वर आणि परमात्मा इत्यादी नावांनी संबोधला जातो॥२३॥

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिञ्च च गुणैः सह।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते॥२४॥**

जो या प्रणालीद्वारे पुरुष-तत्त्व (परमात्मा), सगुणा माया (प्रकृती) आणि जीव-तत्त्वाशी अवगत आहे, तो जडजगात अवस्थान करूनही पुनर्जन्म प्राप्त करत नाही॥२४॥

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना।**

**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे॥२५॥**

भक्तगण भगवत्-चिंतेद्वारे स्वतःच हृदयात परम पुरुषाचे दर्शन करतात. ज्ञानिगण सांख्ययोगाद्वारे, योगिगण अष्टाङ्गयोगाद्वारे आणि कोणी निष्काम कर्मयोगाद्वारे त्याच्या दर्शनाचा प्रयत्न करतात॥२५॥

**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः॥२६॥**

परंतु, काही लोक या प्रकारच्या तत्त्वास न जाणून अन्य आचार्यांच्या निकट उपदेश श्रवण करून उपासना करतात, ते सुद्धा श्रवणनिष्ठ होऊन क्रमशः मृत्युरूप संसारास अवश्य अतिक्रमण करतात॥२६॥

**यावत्संजायते किञ्चित् सत्त्वं स्थावरजङ्गमम्।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ॥२७॥**

हे भरतर्षभ! जे पण स्थावर-जङ्गमात्मक प्राणी उत्पन्न होतात, ते सर्व क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या संयोगाने उत्पन्न होते-असे जाणा॥२७॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति॥२८॥**

जे सर्व जीवांमध्ये समभावाने अवस्थित आहेत, विनाशशीलांमध्ये अविनाशी परमेश्वराला पाहतात, तेच यथार्थदर्शी आहेत॥२८॥

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम्।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम्॥२९॥**

कारण, ते सर्व जीवांमध्ये सम्यकरूपेण अवस्थित परमेश्वरास पाहून मनाच्या द्वारे स्वतःस अधःपतित करत नाही, म्हणूनच परम गती (स्थान) प्राप्त करतात॥२९॥

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः।**
**यः पश्यति तथात्मानमकर्त्तारं स पश्यति॥३०॥**

जे सर्व कर्मांना प्रकृतीच्या द्वारेच संपादित पाहतात आणि आत्म्यास अकर्ता पाहतात, तेच यथार्थात पाहतात॥३०॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति।**
**तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा॥३१॥**

जेव्हा मी जीवांच्या पृथक-पृथक भावास एकाच प्रकृतीत स्थित आणि त्या प्रकृतीपासूनच उत्पन्न जाणू शकतो, तेव्हा तो ब्रह्मभाव प्राप्त करतो॥३१॥

**अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते॥३२॥**

हे कौन्तेय! अनादी आणि निर्गुण असल्यामुळे तो अव्यय परमात्मा शरीरात स्थित होऊनही न कर्म करतो आणि न कर्मफलाने लिप्त होतो॥३२॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते॥३३॥**

ज्याप्रकारे सर्वत्र अवस्थित आकाश सूक्ष्म असल्यामुळे लिप्त होत नाही, त्याच प्रकारे संपूर्ण देहात अवस्थित परमात्मा सुद्धा दैहिक गुण–दोषांनी लिप्त होत नाही॥३३॥

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत॥३४॥**

हे भारत! ज्या प्रकारे एक सूर्य या संपूर्ण जगतास प्रकाशित करतो, त्याच प्रकारे परमात्मा समग्र देहाला प्रकाशित करतो॥३४॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा।**
**भूतप्रकृतिमोक्षञ्च ये विदुर्यान्ति ते परम्॥३५॥**

जो अश्या प्रकारे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या भेद आणि ज्ञानचक्षूद्वारे प्रकृतीपासून भूतगणाच्या (जीवगणाच्या) मोक्षाच्या उपायाशी अवगत आहे, ते परमपद प्राप्त करतात॥३५॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'प्रकृति–पुरुषविवेकयोगो' नाम त्रयोदशोऽध्यायः।**

**॥तेरावा अध्यायः समाप्त॥**

# अध्याय १४
## चतुर्दशोऽध्यायः
### श्रीभगवानुवाच—

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः॥१॥**

श्री भगवान म्हणाले—सर्व ज्ञान-साधनांमध्ये अत्युत्तम एक ज्ञान उपदेश तुम्हाला सांगेन, ज्याला जाणून या मुनिगणाने या देहबंधनातून परामुक्ती प्राप्त केली आहे॥१॥

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च॥२॥**

या ज्ञानाचा आश्रय करून मुनिगण माझ्या सारूप्य-धर्मास प्राप्त करून सृष्टिकालात जन्म ग्रहण करीत नाहीत आणि प्रलयकालात मृत्यु-यंत्रणा देखील भोगीत नाहीत॥२॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्।**
**सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत॥३॥**

हे भारत! महत्-ब्रह्मरूपी प्रकृती माझी योनी अर्थात गर्भाधान स्थान आहे. त्यात मी तटस्थ प्रभावरूप जीव (बीजा) चे आधान (रोपण) करतो. त्यापासूनच समस्त जीवांचा जन्म होतो॥३॥

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्त्तयः सम्भवन्ति याः।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता॥४॥**

हे कुन्तीनन्दन! देव, पशू इत्यादी योनींमध्ये जे शरीर उत्पन्न होतात, महत्-ब्रह्म अर्थात प्रकृती त्याची योनी अर्थात जननीस्वरूपा आहे आणि मी बीज आधानकर्ता पितास्वरूप आहे॥४॥

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम्॥५॥**

हे महाबाहो! प्रकृतीपासून उत्पन्न सत्त्व, रज आणि तम—हे तीन गुण शरीरात अवस्थित निर्विकार देही अर्थात जीवाला बांधतात॥५॥

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात् प्रकाशकमनामयम्।**
**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ॥६॥**

हे निष्पाप! त्या तीन गुणांमध्ये निर्मल झाल्या कारणाने प्रकाशक

आणि दोषरहित शांत सत्त्वगुण ज्ञान आणि सुखाच्या संगाद्वारे जीवाला आबद्ध करतो॥६॥

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम्।**
**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम्॥७॥**

हे कुन्तीपुत्र! रजोगुणाला रागात्मक आणि विषयांची अभिलाषा आणि आसक्तीपासून उत्पन्न जाणा. तो रजोगुण कर्माला आसक्तीद्वारे जीवाला बांधतो॥७॥

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत॥८॥**

परंतु, हे भारत! अज्ञानापासून उत्पन्न तमोगुणाला सर्व जीवांचा मोह जाणा. तो प्रमाद, आलस्य आणि निद्राद्वारे देहीला आबद्ध करतो॥८॥

**सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत॥९॥**

हे भारत! सत्त्वगुण सुखात आणि रजोगुण कर्मात आसक्त करतो, परंतु तमोगुण ज्ञानाला आच्छन्न करून मनोयोगहीनतेत संयुक्त करतो॥९॥

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत।**
**रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा॥१०॥**

हे भारत! रजोगुण आणि तमोगुणास पराभूत करून सत्त्वगुण उत्पन्न होतो. अशा प्रकारे सत्त्व आणि तमोगुणास पराभूत करून रजोगुण उत्पन्न होतो आणि सत्त्व आणि रजोगुणास पराभूत करून तमोगुण उत्पन्न करतो॥१०॥

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत॥११॥**

ज्यावेळी या देहात कर्ण–नासिका इत्यादी ज्ञानेंद्रियांच्या द्वारात विषयाच्या स्वरूप–प्रकाशरूप ज्ञानाचा उदय होतो, त्या वेळी असे जाणायला हवे की सत्त्वगुणाची वृद्धी झाली आहे आणि सुख–प्रकाशरूप चिह्नाद्वारासुद्धा सत्त्वगुणाच्या वृद्धीला जाणायला पाहिजे॥११॥

**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ॥१२॥**

हे भरतश्रेष्ठ! लोभ, नाना यत्नपरता, कर्मांचा आरंभ, भोगात अशांती आणि विषय–भोगाची अभिलाषा, हे सर्व रजोगुण वाढल्यानंतर उत्पन्न होतात॥१२॥

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन॥१३॥**

हे कुरुनन्दन! विवेकाचा अभाव, प्रयत्नहीनता, अन्यमनस्कता, मिथ्या अभिनिवेश इत्यादी–हे सर्व तमोगुणाची वृद्धी झाल्यावर उत्पन्न होतात॥१३॥

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते॥१४॥**

आणि, जेव्हा कोणी सत्त्वगुणाची वृद्धी झाल्यावर शरीर सोडतो, तेव्हा तो हिरण्यगर्भ इत्यादींच्या उपासकांच्या सुखप्रद (रजोगुण आणि तमोगुणापासून रहित) लोकांना प्राप्त करतो॥१४॥

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते॥१५॥**

जो जीव रजोगुण वाढल्यावर देहत्याग करतो, तो कर्मात आसक्त मनुष्यांत जन्म घेतो, अशा प्रकारे तमोगुण वाढल्यानंतर देहत्याग करणारा पशू इत्यादी मूढ योनीत जन्म घेतो॥१५॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम्।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम्॥१६॥**

पंडितगण असे म्हणतात की सात्त्विक कर्माचे सुखमय फळ होते, राजसिक कर्माचे दुःखमय फळ आणि तामसिक कर्माचे अज्ञानमय फळ होते॥१६॥

**सत्त्वात् सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च॥१७॥**

सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होते. रजोगुणापासून लोभ उत्पन्न होतो आणि तमोगुणापासून प्रमाद, मोह आणि अज्ञान उत्पन्न होतो॥१७॥

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः॥१८॥**

सतोगुणी व्यक्तिगण वरच्या लोकात जातात, रजोगुणी व्यक्तिगण

मनुष्यलोकात राहतात आणि आलस्य-प्रमाद इत्यादी परायण तमोगुणी व्यक्तिगण खालच्या लोकांत जातात॥१८॥

**नान्यं गुणेभ्यः कर्त्तारं यदा द्रष्टानुपश्यति।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति॥१९॥**

ज्या वेळी जीव तीन गुणांच्या अतिरिक्त अन्य कोणालाही कर्त्याच्या रूपात पाहात नाही आणि गुणांच्या अतीत आत्म्याला जाणू शकतो, त्या वेळी तो भावरूपी शुद्धा भक्तीला प्राप्त करतो॥१९॥

**गुणानेतानतीत्य त्रीन् देही देहसमुद्भवान्।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते॥२०॥**

जीव देहाला उत्पन्न करणाऱ्या या तीन गुणांना अतिक्रमण करून जन्म, मृत्यू, जरा आणि दुःखातून मुक्त होऊन मोक्ष प्राप्त करतो॥ २०॥

**अर्जुन उवाच—**

**कैर्लिङ्गैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्त्तते॥२१॥**

अर्जुन म्हणाले—हे प्रभो! तीन गुणांच्या अतीत व्यक्तीचे काय लक्षण आहे, त्यांचे आचार कसे असतात आणि कोणत्या उपायाने ते तीन गुणांना पार करतात?॥२१॥

श्रीभगवानुवाच।

**प्रकाशञ्च प्रवृत्तिञ्च मोहमेव च पाण्डव।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति॥२२॥**
**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते।**
**गुणा वर्त्तन्त इत्येवं योऽवतिष्ठति नेङ्गते॥२३॥**
**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः॥२४॥**
**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः।**
**सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते॥२५॥**

श्रीभगवान म्हणाले—हे पाण्डव! जो प्रकाश, प्रवृत्ती आणि मोह स्वतः प्राप्त करून त्याच्याशी द्वेष करीत नाहीत आणि त्याच्या निवृत्तीची पण अभिलाषा करित नाही, जो उदासीनाप्रमाणे अवस्थित आहे आणि

गुणाचे कार्य सुख-दुःख इत्यादीपासून विचलित नाही झाले आहेत, गुणसमूह आपल्या आपल्या कार्यांत प्रवृत्त होत आहेत-असे जाणून स्थिर राहतात आणि चंचल होत नाहीत, जे सुख-दुःखाला समान समजतात, स्वरूपनिष्ठ आहेत, माती, दगड आणि सोन्याला समान समजतात, बुद्धिमान आहेत, आपल्या निंदा आणि स्तुतीत समान भाव असणारे आहेत, मित्र आणि शत्रूच्या प्रती समान आहेत, देहधारणेच्या व्यतिरिक्त सर्व कर्मांचा परित्याग करणारे आहेत, ते गुणातीत म्हटले जातात॥२२-२५॥

**माञ्च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते।**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते॥२६॥**

जो ऐकान्तिक भावाने श्यामसुन्दराकार माझी अर्थात परमेश्वराची भक्तियोगाद्वारे सेवा करतात, ते या गुणांना पार करून ब्रह्मानुभावास योग्य होतात॥२६॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च॥२७॥**

कारण, मी (निर्विशेष) ब्रह्म, अव्यय मोक्ष, सनातन धर्म आणि ऐकान्तिक भक्तिसंबंधी प्रेमरूप सुखाची प्रतिष्ठा अर्थात आश्रय आहे॥ २७॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**
**ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'गुणत्रयविभागयोगो' नाम चतुर्दशोऽध्यायः।**

**॥चौदावा अध्याय समाप्त॥**

# अध्याय १५

## पञ्चदशोऽध्यायः

**श्रीभगवानुवाच।**
**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्।**
**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित्॥१॥**

श्री भगवान म्हणाले–हा संसार वरती मुळे असणारा आणि खालच्या दिशेला फांद्या असणारा विशेष अश्वत्थ वृक्ष आहे–असे शास्त्रांत सांगितले गेले आहे. कर्माचे प्रतिपादन करणारे हे वाक्य–समूह ज्याची पाने आहेत, जे त्यास जाणतात, ते वेदज्ञ आहेत॥१॥

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः।**
**अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके॥२॥**

तीन गुणांद्वारे वर्धित या संसारवृक्षाच्या विषयरूप पल्लवयुक्त शाखा (फांद्या) मनुष्य, पशू, इत्यादी निम्न योन्यांमध्ये आणि देवता इत्यादी उच्च योन्यांमध्ये पसरलेली आहे. कर्मप्रवाहजनक भोगवासनारूपी जटा खालच्या दिशेने सर्वदा विकसित होत आहेत॥२॥

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च सम्प्रतिष्ठा।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा॥३॥**
**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्त्तन्ति भूयः।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी॥४॥**

या जगात संसारवृक्षाचे स्वरूप पूर्वोक्त प्रकाराने कळत नाही, याचा आदि आणि अंत पाहायला मिळत नाही आणि याची स्थितीदेखील समजत नाही. अत्यंत दृढ मूळ असणाऱ्या या संसार वृक्षाला तीव्र वैराग्यरूप कुऱ्हाडीने छेदन केल्यावर (कापल्यावर) संसाराचे मूळ त्या श्रीभगवत्–पादपद्माचे अन्वेषण करणे कर्तव्य आहे. जे पद प्राप्त झाल्यावर पुन्हा संसारात प्रत्यावर्तन करावे लागत नाही, ज्यांच्यापासून हा अनादी संसार–प्रवाह विस्तृत झाला आहे, त्या आदि पुरुषाला शरणागत होतो – या प्रकारची भावना केल्यावर त्याच्याप्रती शरणागत

व्हायला हवे॥३-४॥

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः।**
**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत्॥५॥**

गर्व आणि मोहशून्य, आसक्तिरूप दोषाने रहित, आत्म-अनुभवामध्ये तत्पर, भोगाच्या अभिलाषेने रहित, सुख-दुःख नामक द्वन्द्वापासून रहित मुक्त पुरुषगण त्या अव्यय पदास प्राप्त करतात॥५॥

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम॥६॥**

ज्या वस्तूला प्राप्त करून शरणागत व्यक्तींचे पुनरागमन होत नाही, ते माझे सर्वप्रकाशक तेज आहे, त्याला सूर्य, चन्द्र, अग्नी इत्यादी काहीच प्रकाशित करू शकत नाही॥६॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।**
**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति॥७॥**

माझेच विभिन्नांश, सनातन जीव या जगात प्रकृतीत स्थित होऊन मन आणि पाच इन्द्रियांना आकर्षित करतात॥७॥

**शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः।**
**गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात्॥८॥**

इन्द्रियांचा स्वामी देही जीव ज्या शरीराला प्राप्त करतो आणि ज्या शरीरातून बहिर्गत होतो, आपल्या सहा इन्द्रियांसोबत त्याच प्रकारे गमन करतो, जसा वायू पुष्प इत्यादीचा गंध घेऊन गमन करतो॥८॥

**श्रोत्रञ्चक्षुः स्पर्शनञ्च रसनं घ्राणमेव च।**
**अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते॥९॥**

हा जीव कान, डोळे, त्वचा, जिव्हा, नासिका आणि मनाचा आश्रय करून शब्द इत्यादी विषयांचा उपभोग करतो॥९॥

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम्।**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः॥१०॥**

अविवेकी मूढ लोक देहातून जाताना अथवा राहत्या समयी अथवा विषयभोगाच्या समयी इंद्रियांशी समन्वित या जिवाला पाहू शकत नाही, परंतु विवेकी जीव यास पाहू शकतात॥१०॥

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम्।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः॥११॥**

प्रयत्नशील, योगयुक्त लोक शरीरात स्थित या आत्म्यास पाहातात, परंतु अशुद्धचित्त, अविवेकी लोक यत्न करूनही यास पाहू शकत नाहीत॥ ११॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम्।**
**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम्॥१२॥**

सूर्य, चंद्र आणि अग्नीचे ते तेज समस्त जगाला प्रकाशित करते, त्या तेजाला माझेच जाणा॥१२॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः॥१३॥**

आणि, मीच आपल्या शक्तीद्वारे पृथ्वीत अधिष्ठित होऊन चर-अचर प्राणिमात्रांस धारण करतो. मीच अमृतमय चंद्र बनून समस्त औषधींना पुष्ट करतो॥१३॥

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्॥१४॥**

मी जठराग्नी होऊन प्राण्यांच्या शरीरात आश्रय करून प्राण-अपान वायूच्या संयोगाने चार प्रकारच्या अन्नांना पचवतो॥१४॥

**भावानुवाद**—जठराग्नीच्या रूपात मी त्याच्या उत्प्रेरक प्राण-अपान वायू सोबत संयुक्त होऊन भक्ष्य, भोज्य, लेह्य (चाटण्या-योग्य) आणि चूष्य (चोखण्या-योग्य)—या चार प्रकारच्या अन्नांना पचवितो. दाता द्वारे खंडित होणारे भाजलेले चणे इत्यादी भक्ष्य आहेत. भात इत्यादी भोज्य आहेत. गूळ इत्यादी लेह्य आहेत. ऊस इत्यादी चूष्य आहेत ॥१४॥

**सा. व. प्रकाशिका वृत्ती**—कीटक-पतंगांपासून मनुष्यांपर्यंत कोणत्याही देहधारी (देह धारण करणाऱ्या) प्राण्यात भोज्य पदार्थाला पचविण्याची स्वतंत्र शक्ती नाही आहे. श्रीभगवान म्हणतात— "जिवांच्या शरीरात मीच जठराग्नीच्या (पोटातील अग्नीच्या किंवा पचन-शक्तीच्या) रूपात अन्नाला पचवितो". म्हणून जो भोजन देखील पचवू शकत नाही, तो काय करू शकतो? म्हणून बल-बुद्धीचा वृथा अहंकार न करून

भगवंतांच्या चरणकमळीच शरणागत होणे त्याच्यासाठी अत्यंत आवश्यक आहे. याच्याद्वारे हे देखील समजले पाहिजे की परमेश्वरच पृथ्वीत अधिष्ठित होऊन आपल्या शक्ती द्वारे भूतांना (जिवांना) धारण करित आहेत, त्यांच्या शक्तीशिवाय काहीच होणे संभव नाही आहे॥ १४॥

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनञ्च।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम्॥१५॥**

मीच सर्व प्राण्यांच्या हृदयात अंतर्यामीच्या रूपात प्रविष्ट आहे. माझ्याकडूनच स्मृती, ज्ञान उत्पन्न होतात आणि दोघांचा नाश सुद्धा माझ्याकडूनच होतो. मीच (वेदव्यासां-द्वारे) वेदांताचा कर्ता आणि वेदज्ञ आहे॥१५॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते॥१६॥**

क्षर आणि अक्षर-हे दोन पुरुष तत्त्व चौदा लोकात प्रसिद्ध आहेत. यांच्यातील चराचर भूतसमूहाला क्षर आणि कूटस्थ पुरुषाला अक्षर म्हटले जाते॥१६॥

आपल्या स्वरूपातून विच्युत होणारा क्षर-जीव आणि आपल्या स्वरूपातून विच्युत न होणारे अक्षर-ब्रह्म.

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युधाहृतः।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः॥१७॥**

परंतु पूर्वोक्त (आधी सांगितलेल्या) क्षर आणि अक्षर तत्त्वापासून भिन्न एक अन्य उत्तम पुरुष परमात्मा म्हणवला जातो, जो ईश्वर आणि निर्विकार आहे आणि तिन्ही लोकांत प्रविष्ट होऊन त्याचे पालन करतो॥१७॥

ज्ञानीचे उपास्य असलेल्या ब्रह्माबद्दल सांगून आता 'उत्तमः' इत्यादी द्वारे योगींचे उपास्य असलेल्या परमात्म्याबद्दल सांगत आहेत. गीता (६.४६) मध्ये म्हटले आहे—'ज्ञानिभ्यश्चाधिको योगी' अर्थात योगी ज्ञानींपेक्षाही श्रेष्ठ आहे. या वाक्याने हेच जाणले जाते की उपासकाचे वैशिष्ट्य असल्यामुळे उपास्याचे देखील वैशिष्ट्य आहे.

**यस्मात् क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः।**

**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः॥१८॥**

कारण मी क्षराच्याही अतीत आणि अक्षरापेक्षाही श्रेष्ठ आहे, म्हणून जगात आणि वेदात पुरुषोत्तमाच्या नावाने प्रसिद्ध आहे॥१८॥

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम्।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत॥१९॥**

हे भारत! जे या प्रकारे मोहशून्य होऊन मला पुरुषोत्तम जाणतात, ते सर्वज्ञ आहेत आणि सर्व प्रकारे माझेच भजन करतात॥१९॥

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान् स्यात् कृतकृत्यश्च भारत॥२०॥**

हे निष्पाप अर्जुन! अशा प्रकारे हे अतिरहस्यपूर्ण शास्त्र माझ्याद्वारे सांगितले गेले आहे. असे जाणून बुद्धिमान लोक अधिकच कृतार्थ होऊन जातात॥२०॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु
ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'पुरुषोत्तमयोगो' नाम पञ्चदशोऽध्यायः।

**॥पंधरावा अध्याय समाप्त॥**

# अध्याय १६

**षोडशोऽध्यायः**

श्रीभगवानुवाच—

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम्॥१॥**
**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम्।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम्॥२॥**
**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता।**
**भवन्ति सम्पदं दैवीमभिजातस्य भारत॥३॥**

श्री भगवान म्हणाले–हे भारत! अभयता, चित्ताची प्रसन्नता, ज्ञानाच्या उपायात निष्ठा, दान, बाह्य इंद्रियांचा संयम, यज्ञ, स्वाध्याय, तप, सरलता, अहिंसा, सत्यवादिता, क्रोधशून्यता, स्त्री–पुत्र इत्यादींमध्ये ममतेचा त्याग, शांती, परनिन्दाशून्यता, दया, लोभशून्यता, मृदुता, लज्जा, अचपलता, तेज, क्षमा, धैर्य, बाह्य आणि आतील शुद्धी, द्रोहशून्यता, अभिमानशून्यता–हे सर्व गुण दैवी संपदेच्या सोबत उत्पन्न व्यक्तीत प्रकट होतात अर्थात शुभलक्षणात जन्म झाल्यावर हे सर्व प्राप्त होतात॥१–३॥

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ सम्पदमासुरीम्॥४॥**

हे पार्थ! दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, निष्ठुरता आणि अविवेक आसुरी संपदेच्या अभिमुख उत्पन्न व्यक्तींमध्ये होतात अर्थात असत्–जात व्यक्तीला ही आसुरी संपदा प्राप्त होतात॥४॥

**दैवी सम्पद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता।**
**मा शुचः सम्पदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव॥५॥**

दैवी संपदेला मोक्षाचे कारण आणि आसुरी संपदेला बंधनाचे कारण म्हटले गेले आहे. हे पांडव! तुम्ही शोक करू नका, कारण तुम्ही दैवी संपत्तीला लक्ष्य करून उत्पन्न झाले आहात॥५॥

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च।**

**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु॥६॥**

हे पार्थ! या संसारात दोन प्रकारची भूतसृष्टी आहे–दैवी आणि आसुरी. दैवी प्रकृतीच्या विषयात विस्ताराने सांगितले आहे. आता माझ्या निकट आसुरी प्रकूतीच्या विषयात ऐका॥६॥

**प्रवृत्तिञ्च निवृत्तिञ्च जना न विदुरासुराः।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते॥७॥**

असुर लोक धर्मात प्रवृत्ती आणि अधर्मातून निवृत्ती जाणत नाहीत. त्यांच्यात शौच, आचार आणि सत्य नसते॥७॥

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम्।**
**अपरस्परसम्भूतं किमन्यत् कामहैतुकम्॥८॥**

ते लोक जगाला मिथ्या, आश्रयहीन, ईश्वरशून्य, एक दुसऱ्याच्या संसर्गाने अथवा स्वतः उत्पन्न म्हणतात. इतकेच नाही ते याला केवळ काममूलक म्हणतात॥८॥

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः॥९॥**

या आसुर दर्शन अथवा सिद्धांताचा आश्रय करून आत्मतत्त्वहीन, देहात्माभिमानी, हिंसा इत्यादी कर्मपरायण असुरगण जगाचा विध्वंस करण्यासाठी जन्म घेतात॥९॥

**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः।**
**मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्रान्हान् प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः॥१०॥**

ते लोक कधीही पूर्ण न होणाऱ्या वासनांचा आश्रय करून दंभ, मान आणि मदयुक्त होऊन, मोहवश असत्–विषयांत आग्रह–युक्त होऊन आणि भ्रष्ट आचरणांना घेऊन क्षुद्र देवतांच्या आराधनेत प्रवृत्त होतात॥ १०॥

**चिन्तामपरिमेयाञ्च प्रलयान्तामुपाश्रिताः।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः॥११॥**
**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान्॥१२॥**

मृत्युपर्यंत असीम चिंतेचा आश्रय करून "कामाचा उपभोगच चरम कार्य आहे"–अशा प्रकारे निश्चय करून शेकडो आशांमध्ये आबद्ध,

काम आणि क्रोधपरायण ते व्यक्तिगण कामभोगासाठी अन्यायपूर्वक अर्थसंग्रहाचे प्रयत्न करतात॥१२॥

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्।**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम्॥१३॥**

ते असा विचार करतात–आज मी हे प्राप्त केले आहे, हे मनोरथ पूर्ण करेन, हे माझे आहे, पुन्हा पुन्हा हे धन सुद्धा माझेच होईल॥ १३॥

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी॥१४॥**

माझ्या द्वारे हे शत्रुगण मारल्या गेले आहेत आणि इतर शत्रूंना पण मी मारेन. मी ईश्वर, भोक्ता, सिद्ध, बलवान आणि सुखी आहे॥१४॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः॥१५॥**

मी धनी आणि कुलीन[1] आहे; माझ्या सारखे आणखी कोण आहे; मी यज्ञ करीन, दान करीन आणि आनंद प्राप्त करीन–ते अज्ञानाद्वारे विमोहित होऊन अशाप्रकारे म्हणतात॥१५॥

**अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ॥१६॥**

नाना मनोरथांद्वारे विक्षिप्त, मोहजालाने आवृत तथा विषयभोगांमध्ये आसक्त ते व्यक्तिगण अपवित्र नरकात पतित होतात॥१६॥

**आत्मसम्भाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम्॥१७॥**

स्वयं गर्वित, अनम्र, धनाच्या कारण मान आणि मदाने युक्त ते असुरगण दंभपूर्वक नाममात्र यज्ञाद्वारे अविधिपूर्वक यज्ञ करतात॥१७॥

**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः॥१८॥**

ते अहंकार, बळ, दर्प, काम आणि क्रोधाचा आश्रय करून परमात्म–परायण साधूंच्या देहात अवस्थित माझा द्वेष करून साधूंच्या गुणांमध्ये दोषांचा आरोप करतात॥१८॥

---

1 कुलवान, कुलवंत

**तानहं द्विषतः क्रुरान् संसारेषु नराधमान्।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु॥१९॥**

मी साधूंचा द्वेष करणाऱ्या, क्रूर आणि अशुभ कर्म करणाऱ्या आणि नराधम त्या सर्वांना जगात आसुरी योन्यांमध्ये अनवरत[2] निक्षेप करतो (फेकतो)॥१९॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि।**
**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम्॥२०॥**

हे कौन्तेय! जन्मोजन्मी आसुरी योनी प्राप्त करून ते मूढ लोक मला प्राप्त न केल्याने त्यापेक्षाही अधम गती प्राप्त करतात॥२०॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्॥२१॥**

काम, क्रोध आणि लोभ–हे तीन आत्मनाशक नरकाचे द्वार आहेत. म्हणून या तिघांचा त्याग करायला हवा॥२१॥

**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम्॥२२॥**

हे कौन्तेय! या तीन नरकाच्या द्वारांतून मुक्त व्यक्ती आत्म–कल्याणाचे आचरण करतो, ज्याच्याद्वारे तो श्रेष्ठ गती प्राप्त करतो॥२२॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम्॥२३॥**

जो शास्त्रीय विधींचे उल्लंघन करून स्वेच्छाचारवश कार्यात प्रवृत्त होतात, तो न सिद्धी, न सुख आणि न परागतीस प्राप्त होतो॥२३॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि॥२४॥**

म्हणून कार्य–अकार्याच्या व्यवस्थेच्या विषयात शास्त्रच तुमचे प्रमाण आहेत. या कर्तव्य–विषयात शास्त्रात उपदिष्ट कर्मांशी अवगत होऊन ते करण्याच्या निमित्त योग्य व्हा॥२४॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि**
**श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**

ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'दैवासुरसम्पद्विभागयोगो' नाम

---

2 अविश्रांत, निरंतर, अविरत

# अध्याय १७

## सप्तदशोऽध्यायः

**अर्जुन उवाच—**

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः॥१॥**

अर्जुन म्हणाले—हे कृष्ण! जे लोक शास्त्राच्या विधींचा त्याग करून श्रद्धायुक्त होऊन पूजा इत्यादी करतात, त्यांची निष्ठा किंवा स्थिती काय आहे? ते सात्त्विक अथवा राजसिक अथवा तामसिक—काय आहेत?॥१॥

**श्रीभगवानुवाच—**

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु॥२॥**

श्रीभगवान म्हणाले—मनुष्यांची श्रद्धा तीन प्रकारची असते—सात्त्विकी, राजसी आणि तामसी. ती पूर्वजन्मांच्या संस्काराने उत्पन्न होते, त्याबद्दल ऐका॥२॥

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः॥३॥**

हे भारत! सर्वांची श्रद्धा आपापल्या अंतःकरणाच्या अनुरूप असते. हा पुरुष श्रद्धामय आहे, म्हणून ती व्यक्ती ज्या पूज्य वस्तूत श्रद्धा करते, ती सुद्धा तशीच चित्ताची होते॥३॥

**यजन्ते सात्त्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः॥४॥**

सात्त्विक गुणांचे लोक देवतांची पूजा करतात, जे की सात्त्विक आहेत, रजोगुणाचे लोक यक्ष आणि राक्षसांची पूजा करतात, जे की राजसी आहेत, आणि तमोगुणातील लोक भूत-प्रेतांची पूजा करतात, जे की तामसी आहेत॥४॥

**अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः।**
**दम्भाहङ्कारसंयुक्ताः कामरागबलान्विताः॥५॥**

**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः।**
**माञ्चैवान्तःशरीरस्थं तान् विद्ध्यासुरनिश्चयान्॥६॥**

दंभ, अहंकार, काम, आसक्ती आणि बलाने युक्त जे अविवेकी लोक शरीरात स्थित भूतसमूहाला आणि अंतःकरणात स्थित मला क्षीण करून अशास्त्रीय विधीने कठीण तपस्या करतात, ते आसुरिक धर्मात निष्ठित जाणा॥५-६॥

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु॥७॥**

जसा आहार सुद्धा सर्वांना तीन प्रकारचा प्रिय असतो, तसाच यज्ञ, तपस्या आणि दान सुद्धा तीन प्रकारचे असतो. त्या सर्वांच्या या भेदास ऐका॥७॥

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्द्धनाः।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः॥८॥**

आयुष्य, उत्साह, बल, आरोग्य, सुख आणि प्रीति वाढवणारे रसयुक्त, स्निग्ध, स्थायी, हृदयग्राही आहारसमूह सात्त्विक प्रकृती असणाऱ्यांना प्रिय आहेत॥८॥

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरुक्षविदाहिनः।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः॥९॥**

अधिक कडू, आंबट, लवणयुक्त, गरम, तिखट, रुक्ष, दाहकारक, दुःख, शोक आणि रोगप्रद आहारसमूह राजस व्यक्तीला प्रिय आहेत॥ ९॥

**यातयामं गतरसं पूति पर्युषितञ्च यत्।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥१०॥**

एक प्रहर आधी बनवलेले थंड, नीरस, दुर्गंधीयुक्त, शिळे, उच्छिष्ट (उष्टे) आणि अपवित्र आहारसमूह तामस पुरुषाला प्रिय आहेत॥१०॥

**अफलाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदिष्टो य इज्यते।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः॥११॥**

'यज्ञाचे अनुष्ठान कर्तव्य आहे'-अशा प्रकारे मनाला एकाग्र करून फलाच्या कामनेने रहित व्यक्तिगणाद्वारे जो यज्ञ केला जातो, तो सात्त्विक आहे॥११॥

**अभिसन्धाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत्।**

**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम्॥१२॥**

परंतु, हे भरतश्रेष्ठ! फळाला उद्देश करून आणि दंभाचा प्रकाश (आपली महिमा दाखविण्यासाठी) जो यज्ञ केला जातो, त्यास राजस जाणा॥१२॥

**विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम्।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते॥१३॥**

विधिहीन, अन्नदानरहित, मन्त्रहीन, दक्षिणाहीन आणि श्रद्धाहीन यज्ञाला पंडितगण तामस यज्ञ म्हणतात॥१३॥

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम्।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते॥१४॥**

देवता, ब्राह्मण, गुरु आणि प्राज्ञगणाची पूजा, शौच, सरलता, ब्रह्मचर्य आणि अहिंसा शरीरासंबधी तप म्हणविले जातात॥१४॥

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितञ्च यत्।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते॥१५॥**

उद्वेग न देणारे, सत्य, प्रिय आणि हितकारी वचन आणि वेदपाठाचा अभ्यास–हे वाचिक तप आहे.॥१५॥

**मनः प्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते॥१६॥**

चित्ताची प्रसन्नता, सरलता, मौन, चित्ताचा संयम, व्यवहारात निष्कपटता–हे सर्व मानसिक तप म्हणविले जातात॥१६॥

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः।**
**अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते॥१७॥**

फलकामनारहित एकाग्रचित्त मनुष्याद्वारे परम श्रद्धेने केल्या गेल्यावर पंडितगण या तीन तपांना सात्त्विक म्हणतात॥१७॥

**सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत्।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम्॥१८॥**

सत्कार, मान आणि पूजेसाठी दंभाने जी तपस्या केली जाते, ती अनित्य आणि अनिश्चित राजसिक तप आहे॥१८॥

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम्॥१९॥**

मूढोचित हट्टाद्वारे स्वतःला पिडीत करून किंवा दुसऱ्याच्या विनाशाकरिता जे तप केले जाते, त्यास तामस म्हणतात॥१९॥

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम्॥२०॥**

प्रत्युपकार करण्यास असमर्थ व्यक्तीस, तीर्थ इत्यादी स्थानांमध्ये, पुण्यकाळात आणि योग्य पात्राला दान देणे कर्तव्य आहे—अशा प्रकारे निश्चय करून जे दान दिले जाते ते सात्त्विक म्हणविले जाते॥२०॥

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम्॥२१॥**

परंतु जे दान प्रत्युपकाराच्या आशेने, फळाच्या उद्देशाने अथवा नंतरच्या पश्चात्तापाने दिले जाते, ते राजस म्हटले जाते॥२१॥

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम्॥२२॥**

जे दान अयोग्य स्थान आणि अयोग्य समयी आणि अयोग्य पात्रांना तिरस्कारपूर्वक आणि अवज्ञापूर्वक दिले जाते, ते तामस म्हटले जाते॥ २२॥

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा॥२३॥**
**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः।**
**प्रवर्त्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम्॥२४॥**

ब्रह्माचे तीन प्रकारचे निर्देशक नाम म्हटले गेले आहेत–ॐ, तत् आणि सत्. यांच्या द्वारे प्राचीन काळात ब्राह्मणगण, वेदसमूह आणि यज्ञसमूह निर्मित झाले आहेत. म्हणून 'ॐ' शब्दाच्या उच्चारणाने वेदवादींच्या शास्त्रोक्त यज्ञ, दान, तप, कर्म इत्यादी सर्वदा अनुष्ठित होतात॥२३–२४॥

**तदित्यनभिसन्धाय फलं यज्ञतपःक्रियाः।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः॥२५॥**

मुमुक्षुगण 'तत्' शब्दाचे उच्चारण करून कर्मफलाची कामना न करता अनेक प्रकारचे यज्ञ, तप, दान इत्यादी कार्य करतात॥२५॥

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत् प्रयुज्यते।**

**प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते॥२६॥**

हे पार्थ! ब्रह्मत्वात आणि ब्रह्मवादित्वात या "सत्" शब्दाचा प्रयोग होतो. त्याच प्रकारे मांगलिक कर्मात सुद्धा "सत्" शब्दाचा प्रयोग होतो॥२६॥

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते।**
**कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते॥२७॥**

यज्ञ, तपस्या, दान आणि त्यांच्या साठी निश्चयपूर्वक अवस्थानात 'सत्' शब्दाचा वापर होतो. ब्रह्माच्या परिचर्येच्या उपयोगी मंदिर–मार्जन इत्यादीला देखील "सत्" शब्दाने अभिहित केले जाते॥२७॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्।**
**असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह॥२८॥**

हे पार्थ! अश्रद्धापूर्वक जे होम, दान, तपस्या आणि इतर कर्म अनुष्ठित होतात, ते असत् म्हटले जातात. ते न तर या लोकात आणि न परलोकात फलदायक असतात॥२८॥

**इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'श्रद्धात्रयविभागयोगो' नाम सप्तदशोऽध्यायः॥१७॥**

**॥सतरावा अध्याय समाप्त॥**

# अध्याय १८

अथाष्टादशोऽध्यायः

**अर्जुन उवाच—**

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम्।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन॥१॥**

अर्जुन म्हणाले—हे महाबाहो! हे हृषीकेश! हे केशिनिसूदन! मी संन्यास आणि त्यागाच्या तत्त्वास वेग-वेगळे जाणू इच्छितो॥१॥

श्रीभगवानुवाच।

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः॥२॥**

श्रीभगवान म्हणाले—निपुण पंडितगण काम्य कर्मांच्या स्वरूपतः त्यागास संन्यास समजतात आणि सर्व कर्मांच्या फलाच्या त्यागास त्याग म्हणतात॥२॥

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे॥३॥**

सांख्यवादी कोणी-कोणी मनीषी असे म्हणतात की कर्ममात्र दोषयुक्त आहे, म्हणून ते त्यागण्या योग्य आहे. आणि दुसरे मीमांसक असे म्हणतात की यज्ञ, दान, तपस्या इत्यादी कर्म त्यागण्यायोग्य नाहीत॥३॥

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः॥४॥**

हे भरतश्रेष्ठ! त्यागाच्या संबंधाने माझा निश्चय श्रवण करा. हे पुरुषवर! त्याग तीन प्रकारचा म्हटला गेला आहे॥४॥

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत्।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्॥५॥**

यज्ञ, दान आणि तपस्यारूप कर्म स्वरूपतः त्याज्य नाही आहे, ते कर्तव्य कर्म आहे. यज्ञ, दान, दान आणि तपस्या मनीषींच्या चित्ताला शुद्ध करणारी आहे॥५॥

**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च।**

**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम्॥६॥**

हे पार्थ! हे सर्व कर्मसुद्धा कर्तापणाचा अभिमान आणि फलाकांक्षेच्या रहित होऊन करणेच कर्तव्य आहे, हेच माझे निश्चित, उत्तम मत आहे॥६॥

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः॥७॥**

परंतु, नित्य कर्माचा संन्यास उचित नाही. मोहवश त्याचा परित्याग तामसिक म्हणवला जातो॥७॥

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत्।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत्॥८॥**

जो दुःखजनक मानून शारीरिक कष्टाच्या भयाने कर्माचा परित्याग करतात, तो राजस त्याग करीत त्यागाच्या फलापासून वंचित राहतात॥८॥

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन।**
**सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः॥९॥**

हे अर्जुन! कर्तापणाचा अभिमान आणि फलकामनेचा त्याग करून कर्तव्य समजून जे नित्य कर्म केले जाते, तो सात्त्विक त्याग मानला गेला आहे॥९॥

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः॥१०॥**

सत्त्वगुणाने संपन्न, स्थिर बुद्धीचा आणि संशयरहित त्यागी दुःखजनक कर्माचा द्वेष करीत नाही आणि सुखजनक कर्मात अनुरक्त होत नाही॥१०॥

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते॥११॥**

देहधारी जीवासाठी सर्व कर्मांचा स्वरूपतः त्याग संभव नाही आहे, परंतु जे लोक सर्व कर्मांच्या फलांना त्यागणारे आहेत, ते त्यागी आहेत–असे म्हटले जाते॥११॥

**अनिष्टमिष्टं मिश्रञ्च त्रिविधं कर्मणः फलम्।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित्॥१२॥**

पूर्वोक्त त्यागरहित व्यक्तींच्या देहत्यागानंतर त्यांना तीन प्रकारचे फळ प्राप्त होते–नारकित्व, देवत्व आणि मनुष्यत्व. परंतु, संन्यासींचे कदापि असे होत नाही॥१२॥

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे।**
**सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्॥१३॥**

हे महाबाहो! कर्माला समाप्त करणाऱ्या वेदांतशास्त्रात सर्व कर्मांच्या सिद्धीसाठी पाच कारणे सांगितली गेली आहेत, त्यांना माझ्याकडून श्रवण कर॥१३॥

**अधिष्ठानं तथा कर्त्ता करणञ्च पृथग्विधम्।**
**विविधाश्च पृथक् चेष्टा दैवञ्चैवात्र पञ्चमम्॥१४॥**

देह, कर्ता, इन्द्रिये आणि विविध कार्ये आणि पंचम स्थानीय सर्वप्रेरक अन्तर्यामी–वेदांतात हे पाच कारण सांगितले गेले आहेत॥१४॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत् कर्म प्रारभते नरः।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः॥१५॥**

मानव काया (शरीर), वाक्य आणि मनाद्वारे धर्मयुक्त किंवा अधर्मयुक्त जे काही कार्य करतो, हे पाचच त्याचे कारण आहेत॥१५॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलन्तु यः।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः॥१६॥**

असे असल्यावरही जी व्यक्ती केवळ आत्म्याला त्या समस्त कर्मांचा कर्ता समजून विचार करते, असंस्कृत बुद्धीची असल्या कारणाने ती दुर्मती व्यक्ती ठीक समजू शकत नाही॥१६॥

**यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते।**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते॥१७॥**

ज्याला कर्तापणाचा अभिमान नाही आणि ज्याची बुद्धी कर्मफळात आसक्त झाली नाही, ते समस्त प्राण्यांची हत्या करूनही वस्तुतः हत्या करत नाहीत आणि त्या फळात आबद्ध पण होत नाहीत॥१७॥

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना।**
**करणं कर्म कर्त्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः॥१८॥**

ज्ञान, ज्ञेय आणि परिज्ञाता–या तीन कर्मप्रबृत्तीचे कारण आहेत. करण, कर्म आणि कर्ता–हे तीन कर्माचे आश्रय आहेत॥१८॥

**ज्ञानं कर्म च कर्ताच त्रिधैव गुणभेदतः।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि॥१९॥**

गुण-निरूपक सांख्य शास्त्रात सात्त्विक इत्यादी भेदाने ज्ञान, कर्म आणि कर्ता देखील तीन प्रकारचे सांगितले गेले आहेत. तुम्ही त्या सर्वांना देखील यथावत् माझ्याकडून ऐका॥१९॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम्॥२०॥**

ज्या ज्ञानाद्वारे परस्पर भिन्न मनुष्य, देव, पशू, पक्षी इत्यादी शरीरात नाना प्रकारच्या फळांना भोगण्यासाठी वर्तमान एका जीवात्म्याला अखंड आणि अव्यय रूपात पाहिल्या जात अर्थात परस्पर भिन्न असूनही चित्-गुणात एक समान उपलब्ध केले जाते, त्या ज्ञानाला सात्त्विक जाणा॥२०॥

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान्।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम्॥२१॥**

परंतु देव, मनुष्य इत्यादी सर्व जीवांत वेगवेगळे जे जीव-संबंधी ज्ञान आहे, त्याच्या द्वारा जीवाचे पृथक जातीय आणि नाना अभिप्राय असणारे उपलब्ध केले जाते, अश्या ज्ञानाला राजसिक जाणा॥२१॥

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन् कार्ये सक्तमहैतुकम्।**
**अतत्त्वार्थवदल्पञ्च तत्तामसमुदाहृतम्॥२२॥**

आणि जे ज्ञान स्नान-भोजन इत्यादी दैहिक कार्यांना पूर्ण मानून त्याच्यात आविष्ट करून टाकते, ते तामसिक ज्ञान म्हणविले जाते॥ २२॥

**नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम्।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत् सात्त्विकमुच्यते॥२३॥**

जे नित्य-कर्म फलकामनेने रहित व्यक्ती द्वारा आसक्तिशून्य होऊन आणि राग-द्वेषाने रहित होऊन केले जाते, ते सात्त्विक कर्म म्हणविले जाते॥२३॥

**यत्तु कामेप्सुना कर्म साहङ्कारेण वा पुनः।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम्॥२४॥**

परंतु, जे कर्म फळाची कामना करणाऱ्या आणि अहंकारी व्यक्ती द्वारा

अत्यंत क्लेशपूर्वक केले जाते, ते राजसिक म्हणविले जातात॥२४॥

**अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम्।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते॥२५॥**

जे कर्म भावी क्लेश, धर्म-ज्ञान इत्यादीचा नाश, आत्मनाश किंवा परपीडनासाठी केले जाते तथा आपल्या सामर्थ्याची आलोचना न करता मोहवश केले जाते, ते तामसिक म्हटले जाते॥२५॥

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते॥२६॥**

फळाच्या कामनेने रहित, अहंकारशून्य, धैर्य आणि उत्साह असणारे आणि कार्याच्या सिद्धीत निर्विकार राहणारा कर्ताच सात्त्विक कर्ता म्हणवला जातो॥२६॥

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः॥२७॥**

कर्मात आसक्त, कर्मफलाची कामना करणारे, विषयात आसक्त, हिंसाप्रिय, शुचिहीन आणि हर्ष आणि शोकयुक्त कर्ता राजसिक म्हणविला जातो॥२७॥

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते॥२८॥**

अनुचित कार्यप्रिय, स्वभावाच्या अनुसार चेष्टायुक्त, अनम्र (उद्धट), शठ, दुसऱ्याचा अपमान करणारा, आळशी, शोकमग्न आणि दीर्घसूत्री कर्ता तामसिक म्हणवला जातो॥२८॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं श्रृणु।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनञ्जय॥२९॥**

हे धनंजय! गुणाच्या अनुसार बुद्धी आणि धृतीचे जे तीन भेद आहेत, त्यांना पृथक-पृथक संपूर्ण रूपात सांगितले जात आहे, तुम्ही श्रवण करा॥२९॥

**प्रवृत्तिञ्च निवृत्तिञ्च कार्याकार्ये भयाभये।**
**बन्धं मोक्षञ्च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी॥३०॥**

हे पार्थ! जी बुद्धी प्रवृत्ती-निवृत्ती, कार्य-अकार्य, भय-अभय आणि बन्धन-मोक्षाला जाणू शकतो, ती सात्त्विकी बुद्धी आहे॥३०॥

**यया धर्ममधर्मञ्च कार्यञ्चाकार्यमेव च।**
**अयथावत् प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी॥३१॥**

हे पार्थ! ज्याच्याद्वारे धर्म-अधर्म आणि कार्य-अकार्याला यथार्थतः जाणले जाऊ शकत नाही, ती बुद्धी राजसी आहे॥३१॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता।**
**सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी॥३२॥**

हे पार्थ! जी बुद्धी अधर्माला धर्म मानते आणि सर्व विषयात विपरीत अर्थ करते, ती बुद्धी तमोगुणाने आच्छादित असल्या कारणाने तामसी आहे॥३२॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी॥३३॥**

हे पार्थ! योगाभ्यासपूर्वक ज्या अव्यभिचारिणी धृतिद्वारा पुरुष, मन, प्राण आणि इन्द्रियांना नियमित करतो, ती धृती सात्त्विकी आहे॥३३॥

**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन।**
**प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी॥३४॥**

हे पार्थ! हे अर्जुन! आसक्तिवश फलाकांक्षी होऊन पुरुष धृतीद्वारा धर्म, काम आणि अर्थाला धारण करतात, ती धृती राजसी आहे॥ ३४॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी॥३५॥**

अविवेकी-मेधायुक्त व्यक्ती ज्या धृतीद्वारा निद्रा, भय, शोक, विषाद-भोगापासून उत्पन्न मदाचा त्याग करित नाहीत, ती धृती तामसी म्हणविली जाते॥३५॥

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तञ्च निगच्छति॥३६॥**

हे भरतश्रेष्ठ! आता मला तीन प्रकारच्या सुखाच्या विषयात श्रवण करवा. जीव पुन्हा पुन्हा अभ्यासाद्वारे ज्या सुखात रती प्राप्त करतो आणि ज्याच्या द्वारे संसाररूप दुःखाचा अंत होतो, ते सात्त्विक आहे॥ ३६॥

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्।**

**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्॥३७॥**

जे सुख पहिले विषासमान, परंतु परिणामात अमृताच्या समान आणि आत्मविषयक बुद्धीच्या निर्मलतेने उत्पन्न होते, ते सुख सात्त्विक म्हणविले जाते॥३७॥

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम्।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम्॥३८॥**

विषय आणि इंद्रिय संयोगाने जे सुख उत्पन्न होते, ते आधी अमृताच्या समान असते, परंतु परिणामात विषासमान असते. त्या सुखाला राजसिक सुख म्हटले जाते॥३८॥

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम्॥३९॥**

जे सुख आधी आणि नंतर आत्म्याच्या स्वरूपात आवृत करणारे आहे, निद्रा, आलस्य (आळस), प्रमाद इत्यादीने उत्पन्न होते, ते सुख तामसिक म्हटले जाते॥३९॥

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः॥४०॥**

पृथ्वीत अर्थात मनुष्य इत्यादींमध्ये अथवा स्वर्गात, इतकेच नाही तर देवगणात ही तसा प्राणी किंवा वस्तू नाही आहे, जो प्रकृतीपासून उत्पन्न या तीन गुणांपासून मुक्त असेल॥४०॥

| विषय | सात्त्विक | राजसिक | तामसिक | निर्गुण |
|---|---|---|---|---|
| **द्रव्य** | हितकर, पवित्र, सहजप्राप्त | इन्द्रियप्राप्त | दैन्यजनक, अशुद्ध | भगवंताना निवेदित |
| **देश** | वन | ग्राम | द्युतस्थान | भगवंतांचे मन्दिर |
| **फल** | आत्मज्ञानजनित | विषयभोगजनित | मोह–दैन्यजनित | कीर्त्तनादि सेवाजनित |
| **काल** | सुख–धर्मज्ञानलाभ | दुःख, यश, श्रीलाभ | शोक–मोहलाभ | प्रेमानन्द लाभ |
| **ज्ञान** | आत्मविषयक | संशयात्मक आहारविषयक | विहार इत्यादी | परमेश्वर विषयक |
| **कर्म** | भगवदर्पित निष्काम कर्म | भगवदर्पित सकाम कर्म | अशास्त्रीय हिंसा इत्यादी | श्रवण–कीर्त्तन इत्यादी |
| **कारक** | अनासक्त | विषयाविष्ट | अनुसन्धानशून्य | भक्त |
| **श्रद्धा** | आत्मविषयिणी | कर्मविषयिणी | अधर्मविषयिणी | सेवाविषयिणी |
| **अवस्था** | जागरण (जागृत) | स्वप्न | सुषुप्ती | तुरीय |
| **आकृती** | देवत्व | नरत्व | स्थावरत्व | भगवत्पद |
| **निष्ठा** | स्वर्ग | मर्त्त | नरक | भगवत्प्राप्ती |

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणाञ्च परन्तप।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः॥४१॥**

हे परंतप! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्रांच्या कर्म स्वभावाने उत्पन्न गुणांच्या अनुसार विभक्त झाले आहेत॥४१॥

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्॥४२॥**

शम, दम, तप, शौच, सहिष्णुता, सरलता, ज्ञान, विज्ञान आणि आस्तिकता–हे सर्व ब्राह्मणांच्या स्वभावाने उत्पन्न कर्म आहेत॥४२॥

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्।

दानमीश्वरभावश्च क्षत्रकर्म स्वभावजम्॥४३॥

शौर्य, तेज, धृती, दक्षता, युद्धात पाठ न दाखवणे, दान, लोक–नेतृत्वता–हे सर्व क्षत्रियांचे स्वाभाविक कर्म आहेत॥४३॥

**कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्॥४४॥**

कृषी, गोरक्षण, वाणिज्य इत्यादी वैश्यांचे स्वाभाविक कर्म आहेत. दूसऱ्यांचे परिचर्यारूप कर्म शूद्रांसाठी स्वाभाविक आहे॥४४॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु॥४५॥**

आपल्या आपल्या अधिकारानुसार कर्मात निरत (व्यग्र) मानव ज्ञान–योग्यतारूपी सिद्धी प्राप्त करतो. आपल्या आधिकारिक कर्मात निरत व्यक्ती कशाप्रकारे सिद्धी लाभ करू शकतो, याचे श्रवण करा॥४५॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥४६॥**

ज्याच्या पासून जीवांची उत्पत्ती होते, ज्यांच्या द्वारे हे समग्र जगत व्याप्त आहे, मानव आपल्या कर्माद्वारे त्या परमेश्वराचे अर्चन करून सिद्धी प्राप्त करतात॥४६॥

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात्।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥४७॥**

उत्तमरूपाने अनुष्ठित दुसऱ्याच्या धर्मापेक्षा अनुत्तमरूपाने अनुष्ठित निकृष्ठ स्वधर्मच कल्याणजनक आहे. मानव स्वभावविहित कर्म करून कोणत्याही पापाला प्राप्त होऊ शकत नाही॥४७॥

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्।**
**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः॥४८॥**

हे कौन्तेय! दोषयुक्त असूनही स्वाभाविक कर्म त्यागू नये, कारण सर्व कर्म दोषाद्वारे त्याच प्रकारे आवृत आहे, ज्या प्रकारे अग्नी धुराद्वारे॥४८॥

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति॥४९॥**

प्राकृत वस्तुमात्र आसक्तिशून्य बुद्धीचे, वशीकृत चित्ताचे आणि ब्रह्मलोकापर्यंतचे सुख इत्यादींमध्ये स्पृहाशून्य व्यक्ती स्वरूपतः कर्मत्याग करून नैष्कर्मरूपी श्रेष्ठ सिद्धी प्राप्त करू शकतो॥४९॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे।**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा॥५०॥**

हे कौन्तेय! सिद्धिप्राप्त व्यक्ती ज्या उपायाने ब्रह्माला प्राप्त करतात, तो उपाय ज्ञानाची परमगती आहे. त्या उपायाबद्दल माझ्याकडून संक्षेपात ऐका॥५०॥

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च।**
**शब्दादीन् विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च॥५१॥**
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥५२॥**
**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते॥५३॥**

विशुद्ध बुद्धियुक्त होऊन, धृतीद्वारे मनाला संयत करून, शब्द आदि विषयसमूहाचा परित्याग करून, राग-द्वेष दूर करून, पवित्र निर्जन स्थानवासी होऊन, अल्पाहारपूर्वक कायमनोवाक्य संयत करून, सर्वदा भगवत्-चिंतनपरायणतारूप योग आणि वैराग्याचा आश्रय करून, अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध आणि परिग्रह त्यागपूर्वक, निर्मम आणि उपशम प्राप्त पुरुष ब्रह्मानुभवाच्या योग्य असतो॥५१-५३॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्॥५४॥**

ब्रह्मात अवस्थित प्रसन्नचित्त व्यक्ती शोकही करत नाही आणि आकांक्षाही करत नाही. ती सर्व जीवांत समदर्शी होऊन प्रेमलक्षणयुक्त माझी भक्ती प्राप्त करते॥५४॥

**भक्त्या मामभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः।**
**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्॥५५॥**

मी ज्याप्रकारे विभूतिसम्पन्न आहे आणि माझे जे स्वरूप आहे, त्यास ते भक्तिद्वारे तत्त्वतः जाणू शकतात. त्या प्रेमा-भक्तीच्या बलाने मला तत्त्वतः जाणून ते माझ्या नित्य लीलेत प्रवेश करतात॥५५॥

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्॥५६॥**

माझे एकांत भक्त सर्वदा समस्त कर्म करूनही माझ्या कृपेने नित्य, अव्यय

वैकुंठधाम प्राप्त करतात॥५६॥

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव॥५७॥**

कर्तापणाच्या अभिमानाने रहित चित्ताद्वारे सर्व कर्मे मला समर्पित करून आणि माझ्या परायण होऊन निश्चयात्मिका बुद्धिरूप योगाचा आश्रय करून सर्वदा माझ्यात चित्त असणारे बना॥५७॥

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि॥५८॥**

माझे स्मरण परायण होऊन माझ्या अनुग्रहाने तुम्ही सर्व दुर्ग अर्थात विघ्न-बाधांतून उत्तीर्ण व्हाल आणि जर तुम्ही माझ्या गोष्टींना ऐकले नाही, तर तुम्ही संसाररूप नाश प्राप्त कराल॥५८॥

**यदहङ्कारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे।**
**मिथ्यैव व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति॥५९॥**

अहंकाराचा आश्रय करून तुम्ही जर असा विचार करत असाल की युद्ध करणार नाही, तुमचा हा संकल्प खोटा सिद्ध होईल. कारण रजोगुणात्मिका माझी माया तुम्हाला युद्धात नियोजित करेलच॥५९॥

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा।**
**कर्त्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत्॥६०॥**

हे कौन्तेय! मोहवश आता तुम्ही ज्या कार्यास करू इच्छित नाही, स्वभावजात स्वकर्माद्वारे नियंत्रित होऊन अवश्यच ते करण्यासाठी प्रवृत्त व्हाल॥६०॥

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**
**भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया॥६१॥**

हे अर्जुन! सर्वान्तर्यामी परमात्मा सर्व जीवांच्या हृदयात अवस्थान करतो आणि आपल्या मायेद्वारे यंत्रारूढाप्रमाणे जीवाला संसार चक्रात भ्रमण करवितो॥६१॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत।**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्॥६२॥**

हे भारत! सर्व प्रकारे त्या ईश्वराला शरण जा. त्याच्या कृपेने परम शांती आणि नित्यधाम प्राप्त कराल॥६२॥

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु॥६३॥**

अशाप्रकारे माझ्याद्वारे तुम्हाला गुह्यतर ज्ञान सांगितले गेले आहे. या गुह्यतर ज्ञानाचे ठीक रितीने अवलोकन करून तुमची जशी इच्छा असेल तसे करा॥६३॥

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्॥६४॥**

सर्वापेक्षा अत्यंत गोपनीय माझे परम वाक्य पुन्हा श्रवण करा. तुम्ही मला अत्यंत प्रिय आहात, म्हणून असे जाणून तुमच्या हितासाठी सांगीन॥६४॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥६५॥**

तुम्ही तुमचे चित्त समर्पण करा, माझे नाम-रूप लीला इत्यादीचे श्रवण-कीर्तन इत्यादी परायण होऊन माझे भक्त बना, माझी पूजा करणारे बना आणि मला नमस्कार करा. अशा प्रकारे तुम्ही मला प्राप्त व्हाल. मी तुमच्यापाशी ही सत्य प्रतिज्ञा करतो, कारण तुम्ही मला प्रिय आहात॥६५॥

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥६६॥**

वर्ण, आश्रम इत्यादी समस्त शारिरीक आणि मानसिक धर्मांचा परित्याग करून एकमात्र माझी शरण घ्या. मी तुम्हाला सर्व पापांतून मुक्त करीन, तुम्ही शोक करू नका॥६६॥

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति॥६७॥**

या गीताशास्त्राला तुम्ही कधीही असंयमित, अभक्त, सेवाविहीन आणि माझ्याशी द्वेष करणाऱ्याला सांगू नका॥६७॥

**य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः॥६८॥**

जे परमगुह्य या गीताशास्त्राचा उपदेश माझ्या भक्तांना देतील, ते माझ्याप्रति पराभक्ती करून संशयशून्य होऊन मलाच प्राप्त होतील॥

६८॥

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि॥६९॥**

मनुष्यांमध्ये गीतेची व्याख्या करणाऱ्यांपेक्षा अधिक कोणीही माझे प्रिय कार्य करणारे नाही आहे आणि समस्त जगतामध्ये त्यांच्यापेक्षा अधिक प्रियतर आणखी कोणीच नसेल॥६९॥

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः॥७०॥**

आणि जी व्यक्ती आम्हा दोघांच्या या धर्मसमन्वित संलापाचे अध्ययन करेल, तिच्याद्वारे मी ज्ञानयज्ञाद्वारे पूजित होईल, असा माझा अभिप्राय आहे॥७०॥

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः।**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्॥७१॥**

जी श्रद्धावान आणि द्वेषरहित व्यक्ती याचे श्रवण करते, ती पापमुक्त होऊन पुण्य कर्मींना प्राप्त होणाऱ्या शुभ लोकांना प्राप्त करते॥७१॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा।**
**कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनञ्जय॥७२॥**

हे पार्थ! हे धनंजय! काय हे गीताशास्त्र तुमच्या द्वारे एकाग्र चित्ताने ऐकले गेले आहे आणि काय याला ऐकून अज्ञानजनित तुमचा मोह नष्ट झाला आहे?॥७२॥

अर्जुन उवाच।
नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत।
स्थितोऽस्मि गतसन्देहः करिष्ये वचनं तव॥७३॥

अर्जुन म्हणाले–हे अच्युत! आपल्या कृपेने माझा मोह नष्ट झाला आहे आणि मी आत्मस्मृती प्राप्त केली आहे. माझा संशय दूर झाला आहे आणि मी यथाज्ञान अवस्थित आहे. मी आपल्या आज्ञेचे पालन करीन॥७३॥

सञ्जय उवाच।
इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम्॥७४॥

संजय म्हणाले–अशा प्रकारे मी महात्मा वासुदेव आणि पार्थाच्या मध्ये

झालेला हा अद्भुत रोमांचकारी संवाद ऐकला॥७४॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानिमं गुह्यमहं परम्।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम्॥७५॥

श्रीव्यासदेवांच्या कृपेने मी साक्षात वर्णनकारी स्वयं योगेश्वर श्रीकृष्णांकडून हा परमगुह्य योग ऐकला॥७५॥

राजन् संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः॥७६॥

हे राजन! श्री केशव आणि अर्जुनाचा हा पुण्यमय अद्भुत संवाद वारंवार स्मरण करून मी वारंवार स्मरण करून मी वारंवार हर्षित होतो आहे॥७६॥

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः॥७७॥

हे राजन! श्री हरींच्या त्या अत्यंत अद्भुत रूपाचे वारंवार स्मरण करून मी परम विस्मित होतो आहे आणि पुन्हा पुन्हा हर्षित आणि रोमांचित होतो आहे॥७७॥

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥७८॥**

जेथे योगेश्वर श्रीकृष्ण आणि धनुर्धर अर्जुन आहेत, तेथेच श्री (राजलक्ष्मी), विजय, ऐश्वर्यवृद्धी आणि न्यायपरायणता विद्यमान आहेत–हेच माझे निश्चित मत आहे॥७८॥

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि
श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु
ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे 'मोक्षसंन्यासयोगो' नाम अष्टादशोऽध्यायः॥ १७॥

॥अठरावा अध्याय समाप्त॥

# भगवद्‌पाद श्रीशंकराचार्यांनी वर्णिलेले माहात्म्य

गीता शास्त्रमिदं पुण्यं यः पठेत् प्रयतः पुमान् ।
**विष्णोः पदमवाप्नोति भयशोकादिवर्जितं॥१॥**

जी व्यक्ती भगवद्गीतेमधील उपदेशांचे पालन करते, ती जीवनातील सर्व दुःखे आणि चिंता यामधून मुक्त होते. सर्व प्रकारच्या भयांपासून अशी व्यक्ती मुक्त होऊ शकते व तिचा पुढील जन्म आध्यात्मिक असू शकतो॥१॥

**गीताध्ययनशीलस्य प्राणायामपरस्य च।**
**नैव सन्ति हि पापानि पूर्वजन्मकृतानि च॥२॥**

जर मनुष्याने भगवद्‌गीतेचे प्रामाणिकपणे व पुर्ण गांभीर्याने अध्ययन केले तर भगवंताच्या कृपेने त्याच्या पूर्व जन्मातील दुष्कर्मांचा त्याच्यावर किंचितही परिणाम होत नाही॥२॥

**मलनिर्मोचनं पुंसां जलस्नानं दिने दिने।**
**सकृद्गीतांभसिस्नानं संसारमलनाशनम्॥३॥**

प्रतिदिन मनुष्य पाण्याने स्नान करून स्वच्छ होत असेल, परंतु जर एखाद्याने एकदासुद्धा पवित्र जलरूपी भगवद्गीतेमध्ये स्नान केले, तर त्याची भौतिक जीवनाची मलिनता पूर्णपणे नष्ट होते॥३॥

**गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः।**
**या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता॥४॥**

भगवद्गीता ही स्वतः पुरुषोत्तम श्रीभगवान यांनी सांगितल्यामुळे एखाद्याने इतर कोणतेही वैदिक साहित्य वाचण्याची गरज नाही. केवळ व्यक्तीने लक्षपूर्वक आणि नियमितपणे भगवद्‌गीतेचे श्रवण आणि अध्ययन करणे आवश्यक आहे. वर्तमान युगामध्ये लोक भौतिक कार्यात इतके मग्न आहेत की, त्यांना संपूर्ण वैदिक साहित्याचे वाचन करणे शक्य नाही आणि यांची गरजही नाही. भगवद्गीता हा एकच ग्रंथ पुरेसा आहे. कारण गीता ही संपूर्ण वैदिक ज्ञानाचे सार आहे. तसेच ती स्वतः पुरुषोत्तम भगवंतांनी सांगितली आहे॥४॥

**भारतामृतसर्वस्वं विष्णोर्वक्त्राद्विनिःसृतम्।**
**गीता–गङ्गोदकं पीत्वा पुनर्जन्म न विद्यते॥५॥**

जो गंगेचे पाणी प्राशन करतो त्याला मुक्ती प्राप्त होते, तर जो भगवद्‌गीतेचे अमृत प्राशन करतो त्याच्याबद्दल काय सांगावे? भगवद्गीता ही महाभारतातील अमृत आहे. कारण ती स्वतः आदिविष्णू भगवान श्रीकृष्णांनी सांगितली आहे. भगवद्गीता ही पुरुषोत्तम श्रीभगवान यांच्या मुखातून प्रकट होते तर गंगा ही त्यांच्या चरणकमलातून उत्पन्न होते. अर्थात, भगवंताचे मुख आणि चरणकमल यामध्ये काहीच फरक नाही. पण निःपक्षपाती दृष्टिकोनातून पाहिल्यास आपल्याला हे लक्षात येईल की, भगवद्गीता ही गंगाजलापेक्षाही अधिक महत्त्वपूर्ण आहे॥५॥

**सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः।**
**पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत्॥६॥**

सर्व उपनिषदांचे सार असलेले गीतोपनिषद् किंवा भगवद्‌गीता ही एका गायीसारखी आहे आणि गोपाल म्हणून विख्यात असलेले भगवान श्रीकृष्ण तिचे दूध काढत आहेत. अर्जुन हा वासराप्रमाणे आहे तर विद्वानजन आणि शुद्ध भक्त हे भगवद्‌गीतेचे अमृततुल्य दूध प्राशन करणारे आहेत॥६॥

**एकं शास्त्रं देवकीपुत्रगीतम्**
**एको देवो देवकीपुत्र एव।**
**एको मन्त्रस्तस्य नामानि यानि**
**कर्माप्येकं तस्य देवस्य सेवा॥७॥**

वर्तमान काळात लोक एकच शास्त्र, एकच परमेश्वर, एकच धर्म आणि एकच व्यवसाय असण्यासाठी अत्यंत उत्सुक आहेत. म्हणून *एकं शास्त्रं देवकीपुत्रगीतम्*–अखिल विश्वाकरिता भगवद्‌गीता हे एकच शास्त्र असावे. *एको देवो देवकीपुत्र एव*–अखिल विश्वाकरिता श्रीकृष्ण हे एकच परमेश्वर असावेत, *एको मन्त्रस्तस्य नामानि*–एकच मंत्र, एकच प्रार्थना असावी आणि ती म्हणजे त्यांच्या पवित्र नामाचा जप– *हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥ कर्माप्येकं तस्य देवस्य सेवा*– सर्वांसाठी एकच कर्म

**भगवद्पाद श्रीशंकराचार्यांनी वर्णिलेले माहात्म्य**

असावे व ते म्हणजे भगवंताची भक्तिमय सेवा.

**॥श्रीमद्भगवतगीता माहात्म्य समाप्त॥**

# श्रीवाराह पुराणात वर्णिलेले माहात्म्य

**शौनक उवाच**

**गीतायाश्चैव माहात्म्यं यथावत्सूत मे वद।**
**पुराणमुनिना प्रोक्तं व्यासेन श्रुतिनोदितम्॥१॥**

शौनक ऋषी म्हणाले–हे सूत जी ! अति पूर्व काळातील मुनी श्री व्यास यांच्या द्वारे सांगितलेले आणि श्रुतींमध्ये वर्णित श्रीगीतेचे माहात्म्य मला नीट ऐकवा॥१॥

**सूत उवाच**

**पृष्टं वै भवता यत्तन्महद् गोप्यं पुरातनम्।**
**न केन शक्यते वक्तुं गीतामाहात्म्यमुत्तमम्॥२॥**

सूत म्हणाले–आपण जे पुरातन आणि उत्तम गीता–माहात्म्य विचारले, ते अतिशय गुप्त आहे. म्हणून ते सांगण्यासाठी कोणीही समर्थ नाही॥२॥

**कृष्णो जानाति वै सम्यक् क्वचित्कौन्तेय एव च।**
**व्यासो वा व्यासपुत्रो वा याज्ञवल्क्योऽथ मैथिलः॥३॥**

गीता माहात्म्यास श्रीकृष्णच चांगल्या प्रकारे जाणतात, अर्जुन काही जाणतात आणि व्यास, शुकदेव, याज्ञवल्क्य आणि जनक इत्यादी थोडेबहुत जाणतात॥३॥

**अन्ये श्रवणतः श्रुत्वा लोके संकीर्तयन्ति च।**
**तस्मात्किंचिद्वदाम्यद्य व्यासस्यास्यान्मया श्रुतम्॥४॥**

दुसरे लोक कानोकानी ऐकून लोकात वर्णन करतात. म्हणून श्रीव्यासांच्या मुखातून मी जे काही ऐकले आहे ते आज सांगतो॥४॥

**गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रसंग्रहैः।**
**या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता॥५॥**

जी आपोआप भगवान श्रीविष्णूंच्या मुखकमलातून निघाली आहे ती गीता उत्तम रीत्या कण्ठस्थ करायला हवी. अन्य शास्त्रांच्या संग्रहाने काय फायदा?॥५॥

**यस्माद्धर्ममयी गीता सर्वज्ञानप्रयोजिका।**

**सर्वशास्त्रमयी गीता तस्माद् गीता विशिष्यते॥६॥**

गीता धर्ममय, सर्वज्ञानाची प्रयोजक आणि सर्व शास्त्रमय आहे, म्हणून गीता सर्वश्रेष्ठ आहे॥६॥

**संसारसागरं घोरं तर्तुमिच्छति यो जनः।**
**गीतानावं समारूह्य पारं यातु सुखेन सः॥७॥**

जो मनुष्य घोर संसार-सागर तरून जाऊन इच्छितो त्याने गीतारूपी नौकेवर चढून सुखपूर्वक पार व्हायला हवे॥७॥

**गीताशास्त्रमिदं पुण्यं यः पठेत् प्रयतः पुमान्।**
**विष्णोः पदमवाप्नोति भयशोकादिवर्जितः॥८॥**

जो पुरुष हे पवित्र गीताशास्त्र सावधान होऊन वाचतो तो भय, शोक आदि से रहित होकर श्रीविष्णुपद को प्राप्त होता है॥८॥

**गीताज्ञानं श्रुतं नैव सदैवाभ्यासयोगतः।**
**मोक्षमिच्छति मूढात्मा याति बालकहास्यताम्॥९॥**

ज्यांनी सदैव अभ्यासयोगाने गीतेचे ज्ञान ऐकले नाही तरीही जो मोक्षाची इच्छा करतो तो मूढात्मा (मूर्ख मनुष्य), बालकाप्रमाणे हास्याचा पात्र होतो॥९॥

**ये श्रृण्वन्ति पठन्त्येव गीताशास्त्रमहर्निशम्।**
**न ते वै मानुषा ज्ञेया देवा एव न संशयः॥१०॥**

जे रात्रंदिवस गीताशास्त्र वाचतात किंवा त्याचा पठण करतात किंवा ऐकतात त्यांना मनुष्य नाही किंबहुना निःसंशय देवताच जाणा॥१०॥

**मलनिर्मोचनं पुंसां जलस्नानं दिने दिने।**
**सकृद् गीताम्भसि स्नानं संसारमलनाशनम्॥११॥**

दररोज पाण्याने केलेले स्नान मनुष्यांचा शारिरीक मळ दूर करते परंतु गीतारूपी पाण्यात एकदा केलेले स्नानदेखील जागतिक मळाचा नाश करते॥११॥

**गीताशास्त्रस्य जानाति पठनं नैव पाठनम्।**
**परस्मान्न श्रुतं ज्ञानं श्रद्धा न भावना॥१२॥**
**स एव मानुषे लोके पुरुषो विड्वराहकः।**
**यस्माद् गीतां न जानाति नाधमस्तत्परो जनः॥१३॥**

जो मनुष्य स्वतः गीता शास्त्राचे पठण-पाठण जाणत नाही, ज्याने अन्य लोकांकडून ते ऐकले नाही, स्वतःला त्याचे ज्ञान नाही, ज्याची

त्याच्यावर श्रद्धा नाही, भावना पण नाही आहे, तो मनुष्य जगात भटकणाऱ्या डुक्करासारखाच आहे. त्याच्यापेक्षा अधिक नीच दुसरा कोणी मनुष्य नाही आहे, कारण तो गीता जाणत नाही॥१२-१३॥

**धिक् तस्य ज्ञानमाचारं व्रतं चेष्टां तपो यशः।**
**गीतार्थपठनं नास्ति नाधमस्तत्परो जन॥१४॥**

जे गीतेच्या अर्थाचे पठण करत नाही त्याच्या ज्ञानाचा, आचाराचा, व्रताचा, कृतींचा, तपाचा आणि यशाचा धिक्कार आहे. त्याच्यापेक्षा अधम आणखी कोणी मनुष्य नाही॥१४॥

**गीतागीतं न यज्ज्ञानं तद्विद्धयासुरसंज्ञकम्।**
**तन्मोघं धर्मरहितं वेदवेदान्तगर्हितम्॥१५॥**

जे ज्ञान गीतेत गायले गेले नाही ते वेद आणि वेदांतात निंदित असल्यामुळे त्यास निष्फळ, धर्मरहित आणि आसुरी जाणा॥१५॥

**योऽधीते सततं गीतां दिवारात्रौ यथार्थतः।**
**स्वपन्गच्छन्वदंस्तिष्ठञ्छाश्वतं मोक्षमाप्नुयात्॥१६॥**

जो मनुष्य रात्रंदिवस, झोपताना, चालताना, बोलताना आणि उभे असताना गीतेचे यथार्थतः सतत अध्ययन करतो तो सनातन मोक्ष प्राप्त करतो॥१६॥

**योगिस्थाने सिद्धपीठे शिष्टाग्रे सत्सभासु च।**
**यज्ञे च विष्णुभक्ताग्रे पठन्याति परां गतिम्॥१७॥**

योग्यांच्या स्थानी, सिद्धांच्या स्थानी, श्रेष्ठ पुरुषांसमोर, संतसभेत, यज्ञस्थानात आणि विष्णुभक्तांच्या समोर गीतेचे का पठण करणारा मनुष्य परम गतीला प्राप्त होतो॥१७॥

**गीतापाठं च श्रवणं यः करोति दिने दिने।**
**क्रतवो वाजिमेधाद्याः कृतास्तेन सदक्षिणाः॥१८॥**

जो गीताचे पठण आणि श्रवण दररोज करतो त्याने यथायोग्य दक्षिणा प्रदान करून अश्वमेध आदि यज्ञ केले आहेत, असे मानले जाते॥ १८॥

**गीताऽधीता च येनापि भक्तिभावेन चेतसा।**
**तेन वेदाश्च शास्त्राणि पुराणानि च सर्वशः॥१९॥**

ज्याने भक्तिभावाने एकाग्र, चित्ताने गीतेचे अध्ययन केले आहे त्याने

सर्व वेद, शास्त्र आणि पुराणांचा अभ्यास केला आहे असे मानले जाते॥१९॥

**यः श्रृणोति च गीतार्थं कीर्तयेच्च स्वयं पुमान्।**
**श्रावयेच्च परार्थं वै स प्रयाति परं पदम्॥२०॥**

जो मनुष्य स्वतःच गीतेचा अर्थ ऐकतो, गातो आणि परोपकारासाठी ऐकवतो तो परम पदाला प्राप्त होतो॥२०॥

**नोपसर्पन्ति तत्रैव यत्र गीतार्चनं गृहे।**
**तापत्रयोद्भवाः पीडा नैव व्याधिभयं तथा॥२१॥**

ज्या घरात गीतेचे पूजन होते तेथे (आध्यात्मिक, आधिदैविक आणि आधिभौतिक) तीन तापाने उत्पन्न होणाऱ्या पीडा आणि व्याधींचे भय राहात नाही॥२१॥

**न शापो नैव पापं च दुर्गतिनं च किंचन।**
**देहेऽरयः षडेते वै न बाधन्ते कदाचन॥२२॥**

त्याला शाप किंवा पाप लागत नाही, जरादेखील दुर्गती होत नाही आणि सहा शत्रू (काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर) देहाला पीडा देत नाहीत॥२२॥

**भगवत्परमेशाने भक्तिरव्यभिचारिणी।**
**जायते सततं तत्र यत्र गीताभिनन्दनम्॥२३॥**

जेथे निरंतर गीतेचे अभिनंदन होते तेथे श्रीभगवान परमेश्वरात एकनिष्ठ भक्ती उत्पन्न होते ॥२३॥

**स्नातो वा यदि वाऽस्नातः शुचिर्वा यदि वाऽशुचिः।**
**विभूतिं विश्वरूपं च संस्मरन्सर्वदा शुचिः॥२४॥**

स्नान केले असो किंवा नसो, पवित्र हो किंवा अपवित्र असो, तरीही जो परमात्म–विभूतीचे आणि विश्वरूपाचे स्मरण करतो तो नेहेमी पवित्र आहे॥२४॥

**सर्वत्र प्रतिभोक्ता च प्रतिग्राही च सर्वशः।**
**गीतापाठं प्रकुर्वाणो न लिप्येत कदाचन॥२५॥**

सर्व जागी भोजन करणारा आणि सर्व प्रकारचे दान घेणारा जर गीतेचे वाचन करतो, तो कधीही लेपायमान होत नाही॥२५॥

**यस्यान्तःकरणं नित्यं गीतायां रमते सदा।**

**सर्वाग्निकः सदाजापी क्रियावान्स च पण्डितः॥२६॥**

ज्याचे चित्त सदा गीतेतच रमण करते तो संपूर्ण अग्निहोत्री, नेहेमी जप करणारा, क्रियावान आणि पंडित आहे॥२६॥

**दर्शनीयः स धनवान्स योगी ज्ञानवानपि।**
**स एव याज्ञिको ध्यानी सर्ववेदार्थदर्शकः॥२७॥**

तो दर्शन करण्यायोग्य, धनवान, योगी, ज्ञानी, याज्ञिक, ध्यानी आणि सर्व वेदांचा अर्थ जाणणारा आहे॥२७॥

**गीतायाः पुस्तकं यत्र नित्यं पाठे प्रवर्तते।**
**तत्र सर्वाणि तीर्थानि प्रयागादीनि भूतले॥२८॥**

जेथे गीतेच्या पुस्तकाचे नित्य वाचन होते तेथे पृथ्वीवरील प्रयाग इत्यादी सर्व तीर्थ निवास करतात॥२८॥

**निवसन्ति सदा गेहे देहेदेशे सदैव हि।**
**सर्वे देवाश्च ऋषयो योगिनः पन्नगाश्च ये॥२९॥**

त्या घरात आणि देहरूपी देशात सर्व देवगण, ऋषी, योगी आणि सापांचा सदा निवास असतो॥२९॥

**गीता गंगा च गायत्री सीता सत्या सरस्वती।**
**ब्रह्मविद्या ब्रह्मवल्ली त्रिसंध्या मुक्तगेहिनी॥३०॥**
**अर्धमात्रा चिदानन्दा भवघ्नी भयनाशिनी।**
**वेदत्रयी पराऽनन्ता तत्त्वार्थज्ञानमंजरी॥३१॥**
**इत्येतानि जपेन्नित्यं नरो निश्चलमानसः।**
**ज्ञानसिद्धिं लभेच्छीघ्रं तथान्ते परमं पदम्॥३२॥**

गीता, गंगा, गायत्री, सीता, सत्या, सरस्वती, ब्रह्मविद्या, ब्रह्मवल्ली, त्रिसंध्या, मुक्तगेहिनी, अर्धमात्रा, चिदानन्दा, भवघ्नी, भयनाशिनी, वेदत्रयी, परा, अनन्ता आणि तत्त्वार्थज्ञानमंजरी (तत्त्वरूपी अर्थाच्या ज्ञानाचे भांडार) अशा प्रकारे (गीतेच्या) अठरा नावांचा स्थिर मनाने जो मनुष्य नित्य जप करतो तो शीघ्रच ज्ञानसिद्धी आणि शेवटी परम पदाला प्राप्त होतात॥३०-३२॥

**यद्यत्कर्म च सर्वत्र गीतापाठं करोति वै।**
**तत्तत्कर्म च निर्दोषं कृत्वा पूर्णमवाप्नुयात्॥३३॥**

मनुष्य जे जे कर्म करेल त्यात जर गीता-पाठ चालू ठेवला तर ते

सर्व कर्म निर्दोषतेने संपूर्ण करून त्याचे फळ प्राप्त करेल॥३३॥

**पितृनुद्दश्य यः श्राद्धे गीतापाठं करोति वै।**
**संतुष्टा पितरस्तस्य निरयाद्यान्ति सदगतिम्॥३४॥**

जो मनुष्य श्राद्धात पितरांना लक्ष्य करून गीतेचे वाचन करतो त्याचे पितृगण (पितर) संतुष्ट होतात आणि नरकातून सद्गती प्राप्त करतात॥ ३४॥

**गीतापाठेन संतुष्टाः पितरः श्राद्धतर्पिताः।**
**पितृलोकं प्रयान्त्येव पुत्राशीर्वादतत्पराः॥३५॥**

गीता वाचनाने प्रसन्न झालेले आणि श्राद्धाने तृप्त झालेले पितृगण पुत्राला आशीर्वाद देण्यासाठी तत्पर होऊन पितृलोकात जातात॥३५॥

**लिखित्वा धारयेत्कण्ठे बाहुदण्डे च मस्तके।**
**नश्यन्त्युपद्रवाः सर्वे विघ्नरूपाश्च दारूणाः॥३६॥**

जो मनुष्य गीता लिहून गळयात, हातात किंवा मस्तकावर धारण करतो त्याच्या सर्व विघ्नरूप दारूण उपद्रवांचा नाश होतो॥३६॥

**देहं मानुषमाश्रित्य चातुर्वर्ण्ये तु भारते।**
**न श्रृणोति पठत्येवताममृतस्वरूपिणीम्॥३७॥**
**हस्तात्त्याक्तवाऽमृतं प्राप्तं कष्टात्क्ष्वेडं समश्नुते**
**पीत्वा गीतामृतं लोके लब्ध्वा मोक्षं सुखी भवेत्॥३८॥**

भरतखंडात चार वर्णांमध्ये मनुष्य देह प्राप्त करूनही जो मनुष्य अमृतस्वरूप गीता वाचत नाही किंवा ऐकत नाही तो मनुष्य हातात आलेले अमृत सोडून कष्टाने विष खातो आहे. परंतु जो मनुष्य गीता ऐकतो, वाचतो तो या जगात गीतारूपी अमृताचे पान करून मोक्ष प्राप्त करून सुखी होतो॥३७-३८॥

**जनैः संसारदुःखार्तैर्गीताज्ञानं च यैः श्रुतम्।**
**संप्राप्तममृतं तैश्च गतास्ते सदनं हरेः॥३९॥**

जागतिक दुःखांनी पीडित ज्या मनुष्यांनी गीतेचे ज्ञान ऐकले आहे त्यांनी अमृत प्राप्त केले आहे आणि ते श्री हरीच्या धामाला प्राप्त झाले आहेत ॥३९॥

**गीतामाश्रित्य बहवो भूभुजो जनकादयः।**
**निर्धूतकल्मषा लोके गतास्ते परमं पदम्॥४०॥**

या जगात जनक इत्यादी समान कित्येक राजांनी गीतेचा आश्रय घेऊन पापरहित होऊन परमपद केले आहे॥४०॥

**गीतासु न विशेषोऽस्ति जनेषूच्चावचेषु च।**
**ज्ञानेष्वेव समग्रेषु समा ब्रह्मस्वरूपिणी॥४१॥**

गीतेत उच्च आणि नीच मनुष्य विषयक भेदच नाही, कारण गीता ब्रह्मस्वरूप आहे म्हणून त्यांचे ज्ञान सर्वांसाठी समान आहे॥४१॥

**यः श्रुत्वा नैव गीतार्थं मोदते परमादरात्।**
**नैवाप्नोति फलं लोके प्रमादाच्च वृथा श्रमम्॥४२॥**

गीतेचा अर्थ परम आदराने ऐकून जो आनंदित होत नाही तो मनुष्य प्रमादामुळे या लोकात फळ प्राप्त करत नाही. परंतु व्यर्थ श्रमच प्राप्त करतो॥४२॥

**गीतायाः पठनं कृत्वा माहात्म्यं नैव यः पठेत्।**
**वृथा पाठफलं तस्य श्रम एव ही केवलम्॥४३॥**

गीतेचे वाचन करून जी व्यक्ती माहात्म्याचे वाचन करीत नाही तिच्या वाचनाचे फळ व्यर्थ होते आणि वाचन केवळ श्रमरूपच राहून जाते॥ ४३॥

**एतन्माहात्म्यसंयुक्तं गीतापाठं करोति यः।**
**श्रद्धया यः श्रृणोत्येव दुर्लभां गतिमाप्नुयात्॥४४॥**

या माहात्म्यासोबत जो गीता पाठ करतो आणि जो श्रद्धेने ऐकतो तो दुर्लभ गती प्राप्त करतो॥४४॥

**माहात्म्यमेतद् गीताया मया प्रोक्तं सनातनम्।**
**गीतान्ते च पठेद्यस्तु यदुक्तं तत्फलं लभेत्॥४५॥**

गीतेचे सनातन माहात्म्य मी सांगितले आहे. गीता वाचनाच्या शेवटी जो याचे वाचन करतो तो उपर्युक्त फळास प्राप्त करतो॥४५॥

**इति श्रीवाराहपुराणोद्धृतं श्रीमदगीतामाहात्म्यानुसंधानं समाप्तम्।**

**॥ श्रीवाराह पुराणात वर्णिलेले श्रीमद्भगवद्गीतेचे माहात्म्य समाप्त॥**